

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका









वर्ष १५ वें : प्रजासत्ताक दिन-अंक
फेब्रुवारी : १९६०

# दीपावली

## श्रेयनामावलि

कलाकृति : **महेश** ● भारतीय लोकनृत्यें ( उत्तरप्रदेश )

कथा :

● **अच्युत बर्वे**—पूर ● **पद्माकर गोवईकर**-सूड ● **नरोत्तम भट्ट**—चूक आणि दुरुस्ती ● **उद्धव ज. शेळके**-रांडमुंड ● **चंद्रसेन**-प्रमिला.

काव्य :

● **शिरीष पै** ● **निर्मला देशपांडे**

ललित लेख :

● **पु. भा. भावे**-आरंभ आणि अखेर ● **गोपाळकृष्ण भोबे**—आदिदेव श्री ● **माधव सातवळेकर**-माझ्या कलेची श्रद्धा.

प्रवासवर्णन :

● **अनंत काणेकर**—शेंगशुई ते लोवू.

वैचारिक लेख :

● **श्री. वा. जोशी**—भाषिक दत्तविधान.

सदरें :

● **रा. वि. सोहनी**—शरीरस्य कथा रम्यः ● **कथाकलि**-भारतीय लोकनृत्यें
● **पिनाकि** – **विष्णुशर्मा** – **गोपालन्** – **सोविरा** – **तिरंदाज**—दीपमाला
● भाषा मराठीच ● मूर्ति लहान कीर्ति थोर ● माननीय व्यक्ति-संजीव रेड्डी
● महाराष्ट्र दर्शन, ● **वसंत सवनीस**-पाणपोई.
● परमेश्वर आणि मी – **पु. य. देशपांडे**

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल**. दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.

अनुक्रमणिका



बिल्हण कवीच्या चरित्रातील हे उतारे म्हणजे इ. स. च्या पहिल्या शतकांतील अस्सल महाराष्ट्र वर्णन. या विक्रमादित्याचे शंभराहून शिलालेख सांपडले आहेत आणि त्यांत तत्कालीन समाजस्थिति चांगलीच प्रतिबिंबित झाली आहे. याशिवाय तत्कालीन महापंडित विज्ञानेश्वर यांच्या मिताक्षरी ग्रंथांतील कल्याणसारख्या वैभवशाली शहराचें वर्णन आढळतें तेंहि याठिकाणीं सादर केलें आहे.

हा उतारा 'दख्खनचा प्राचीन इतिहास' या डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या ग्रंथावरून घेतला आहे.

## उघड्या खिडक्यांतून आंत येत चंद्रकिरण, चोर नव्हे !

बिल्हणकवि म्हणतो, लोकांना निर्भयता इतकी पराकाष्ठेची वाटत असे कीं, 'ते रात्रीं आपल्या घराचीं दारें बंद करण्याची देखील काळजी ठेवीत नसत. आणि चोरांच्या ऐवजीं चंद्रकिरण मात्र घरांच्या उघड्या खिडक्यांवाटे आंत शिरणारे होते-' गरिबांविषयीं तो मोठा उदार आणि दानशूर होता, आणि प्रत्येक पुण्यपर्वी तो विधियुक्त षोडश महादानें करी. तो आश्रय धुंडीत सर्व भरतखंडभर फिरत आलेल्या बिल्हणासारिख्या काश्मीरच्या पंडिताला त्यानें पदरीं ठेवून घेऊन विद्यापति म्हणजे पंडितनायक ह्या पदवीस चढविलें, ह्या एका तथ्य गोष्टीवरूनच तें सिद्ध होतें. विज्ञानेश्वर,—म्हणजे ह्या भरतखंडाच्या मोठ्या भागांत आणि विशेषतः ह्या मराठ्यांच्या देशांत, धर्म व व्यवहारनीति ह्यासंबंधीं हरएक प्रकरणांत सांप्रत-कालीं मुख्य प्रमाण म्हणून मानतात असा जो मिताक्षरा नामक ग्रन्थ, त्या ग्रंथाचा कर्ता — हा, ह्या विक्रमादित्याच्याच कारकीर्दींत होऊन गेला आणि तो कल्याण येथें राहत असे. तो म्हणतो ह्या पृथ्वीतलावर कल्याणासारखें शहर मागें नव्हतें, हालीं नाहीं, व पुढें होणार नाहीं. सकल ऐश्वर्यसंपन्न-विक्रमार्कासारखा भूपति कधींहि कोणी पाहिला नव्हता, किंवा ऐकला नव्हता; आणि विशेष काय ? विज्ञानेश्वर पंडित अन्य कोणा ( पुरुषा ) शीं तुळितां येत नाहीं. ही त्रयी स्वर्गातील कल्पलतेतुल्य आहे, ती कल्पांतापर्यंत राहो. (२) तो तत्त्वविज्ञाननाथ चंद्र व दिवाकर आहेत तोंपर्यंत वांचो; तो शब्द निर्माण करतो त्यांपासून मध स्रवतो, आणि विद्वानांस त्यांहून विशेष विस्मयकारक अन्य कांहींच वाटत नाहीं; तो याचकसमुदायास त्यांच्या इच्छेपेक्षांही विपुल धन देतो; मुरमर्दनाच्या स्वरूपाचें ध्यान करतो, आणि देहाबरोबर उत्पन्न होणारे रिपु त्यानें जिंकले आहेत.' (३) 'रघुकुलोत्तमांकुर जो राम त्याचा जणूं यशोराशीच असा जो सेतु त्यापासून तों तहत पर्वतराजा ( हिमालया ) पर्यंत, आणि चपलमत्स्यसंघांनीं व्याप्त अशा मोठमोठ्या लाटा ज्यांत उसळतात अशा पश्चिमसमुद्रापासून तों तहत पूर्वसमुद्रापर्यंत, साऱ्या भूमिखंडांतील राजे पुढें दंडवत् भूमीवर पडून प्रणाम करतात तो प्रभु विक्रमादित्य चन्द्र व तारागण 'जोंवर टिकतील तोंवर ह्या सकल पृथ्वीचें पालन करो.' ● ● ●

'प्रजा' सत्ताक दिन १९६०




सालाबादप्रमाणें यंदाहि उत्साहानें साजरा करण्यांत आला.

अनुक्रमणिका



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : १०

**महेश**

गर्जद्भीमभुजंग भीषण फणा फूत्कार भीतिप्रदः
क्रीडत्प्रेतपिशाचराक्षसगणः प्रत्यक्षतः प्रान्ततः ।
भालस्थ प्रलयानलोद्भटशिखः संक्रान्तसर्वास्पदः
शार्दूलाजिनभृद्भयानकभयो भूयाद्भवो भूतये ।।

— सुभाषितरत्न भांडागारम् शिव प्रकरण क्र. ८७

भासे भेसुर जो भयंकर अशा नागामुळे उग्रश्या
प्रेतें आणि भुतें नि राक्षस जयसभोती नित क्रीडती ।
भाळीं आग जळे विनाशक, धरी अंगात व्याघ्राजिन
सर्वाधार, जरी भयावह करो कल्याण तो शंकर ।।

— **शिरीष पै**

अनुक्रमणिका



# भारतीय लोकनृत्यें

( उत्तरप्रदेश )

उत्तरकडे हिमालय पर्वतांनीं वेढल्या गेलेल्या या सुपीक भूमीची भारतीय नृत्यकलेला मिळालेली मोठी देणगी म्हणजे कथ्थक हा नृत्यप्रकार. ऐतिहासिक अवशेषांवरून आणि जुन्या दाखल्यावरून निश्चित अनुमान करतां येतें कीं या ऐतिहासिक भूमींत पूर्वी नाना तऱ्हेचे लोकनृत्यप्रकार प्रचलित होते. पुढें सरंजामी पद्धति नष्ट झाल्यानंतर लोकनृत्यांच्या या विविध प्रकारांना ओहोटी लागली आणि आज कांहीं तुरळक लोकांमध्येंच ते अस्तित्वांत आहेत.

उत्तर प्रदेशांतील लोकनृत्यांची गंगोत्री म्हणजे भगवान् कृष्णाची कर्मभूमि मथुरा. राधाकृष्णाचें नृत्य तर भारताच्या खेडोपाडी वेगवेगळ्या रूपांत अवतरलें आहे आणि लोकप्रिय झालें आहे त्यामुळें या भागांतील अत्यंत लोकप्रिय नृत्यविभाग म्हणजे 'रासलीला.' बेहोष आणि धुंद अशा संगीताच्या पार्श्वभूमीवर चालणाऱ्या या नृत्याशीं कथ्थक नृत्याचें बरेचसें साम्य आहे.

होळी किंवा डोलजत्रेच्या दिवसांत उत्तर प्रदेशांतील ग्रामीण जीवनांत नृत्याला एक आगळाच बहर येतो. सारे वातावरण रंगमय होतें आणि रंगरंगीन वृत्तोला साजेल असें खेळकर नादब्रह्म गांवोगांवीं घुमूं लागतें.

उत्तरप्रदेशाचा महान् लोकनृत्यप्रकार म्हणजे 'नौटंकी.' हें एक नृत्यनाट्य किंवा मराठी माणसाला परिचित असणाऱ्या तमाशाचें उत्तरहिंदुस्तानीं रूप. सत्य आणि असत्याची लढाई हा या नाट्याचा विषय महाभारत आणि रामायणांतील उपकथानकें दैनंदिन सामाजीक विषय अगर भरतसिंगासारख्या ऐतिहासिक वीर पुरुषाचा आत्मयज्ञ हे नौटंकीचे विषय. आज आमचे तमाशे जसे नागरी झाले आहेत त्याप्रमाणें नौटंकीचे अस्सल ग्रामीण स्वरूप हळूं हळूं लुप्त होत त्याला नागरी स्वरूप प्राप्त होऊं लागले आहे.

वर्षाऋतुच्या आरंभी बरसातीच्या पहिल्या गारेगार तुषारांनीं वातावरण प्रसन्न होतें. ग्रीष्माचा तडाखा सुसह्य होतो. अशा वेळीं 'झुला' गीतें उत्तर प्रदेशांतील स्त्रिया गात असतात. कांहीं झुल्यावर उंच उंच झोके घेत असतात. तर कांहीं हिरवळीवर नाचत असतात. एका बाजूस मुसलमानी अंमल आणि दुसऱ्या बाजूस ब्राह्मणी वर्चस्व यामुळें उत्तर प्रदेशांतील लोकनृत्यकला ऱ्हास पावून हलक्या लोकांच्या हातीं गेली. त्यामुळें आतां कांहीं नृत्यें विशिष्ट जमातींच्या पुरतींच मर्यादित आहेत.'

उदाहरणार्थ अहीर जमात. या जमातींतच भगवान कृष्णाचा जन्म झाला असावा असे म्हणतात. या जमातींत बारशाच्या वेळीं अगर विवाह प्रसंगी ढोलकीच्या तालावर एक सुंदर नृत्य करतात. यावेळीं नृत्यकार आपल्या कमरेभोंवती घुंगरु लावलेले कमरपट्टे लावतात. आणि बाकीच्या उघड्या शरीरावर बाहुभूषणें आणि गळ्यांत माळा असतात. या नृत्याच्या प्रसंगीं नृत्यकाराचा पदन्यास-आणि घुंगरूंचा ताल यांचें साधर्म्य वाखाणण्याजोगें असतें.

कहार जमातीचें एक लोकनृत्य असेंच लोकप्रिय आहे. त्यांत सांघिक गाणीं असतात. या नृत्यांत आवेश आणि गति विलक्षण असते. अश्लील हावभाव हें या नृत्याचें वैशिष्ट्य. आणि त्यामुळें खेडूत प्रेक्षक या नाचावर भलताच आषक असतो.

चमार लोकांचे नृत्य म्हणजे एक विनोदी संगितिका. एकाद्या पौराणिक अगर ऐतिहासिक दंतकथेवर हा विदुषकी स्वरुपाचा नृत्यप्रकार मोठा गंमतीदार असतो.

उत्तर प्रदेशांतील हिमालयाच्या कुशींत राहाणारे आदिवासी फेर धरून नाचतात. या नृत्याला 'झोरा' असें म्हणतात. छापेली हा आदिवासी नृत्यप्रकार प्रेमिकांसाठीं आहे. प्रेमी युगुलें हातांत हात घालून आणि दुसऱ्या हातांत रंगीबेरंगी रुमाल घेऊन नाचतात. याशिवाय 'जागर' नांवाचें नृत्य कांहीं आदिवासी भूतबाधा घालविण्यासाठीं करतात. हिमाचल प्रदेशाच्या सरहद्दीवर राहाणाऱ्या आदिवासींत थाली, जड्डा, झाइंता, थोरा इ. सणावारांच्या प्रसंगी करण्यांत येणारीं लोकनृत्यें लोकप्रिय आहेत. —कथा-कलि

( पृष्ठ ७ वरून चालू )

शैल, खाटलें, त्रिशूळ, भस्माचा ढीग, आजूबाजूला सर्प आणि हातांत नरोटी असा हा अत्यंत साधा वेषधारी तापसी, दक्षकन्या पार्वतीचें प्रेमाचें स्थान बनला. त्या प्रेमाच्या आणि प्रणय विहाराच्या रसभरीत कथा पुराणांत विखुरलेल्या आहेत.

आपल्या या हिंदुस्थानांत अंदाजें ८५ टक्के शिवपूजक असून साधारणपणें १५ टक्के विष्णूपूजक व इतर पंथाचे आहेत. शैवांतहि अनेक पोटभेद आहेत. स्कंद, सौर, गाणपत्य, वीरशैव, लिंगायत, पाशुपत, स्वंद, श्रीविद्या, कापाल, सरभंगी असे अनेक भेद आहेत; परंतु शिव हेंच त्यांचें आराध्य दैवत आहे. सृष्टीच्या उत्पत्तीस कारण म्हणून शिवाची पूजा लिंगाच्या रूपानें केली जाते. सबंध हिंदुस्थानांत १२ प्रसिद्ध ज्योतिर्लिंगें आहेत. त्याला स्वयंभू स्थानें असेंहि म्हणतात.

सौराष्ट्रांत सोमनाथ, श्रीशैल्य पर्वतावर मल्लिकार्जुन, उज्जयनीचा महांकाल, हिमालयांत केदारनाथ, वाराणशीचा काशिविश्वेश्वर, आंवढ्या नागनाथ, रामेश्वर, घृणेश्वर, गोकर्ण वगैरे १२ ज्योतिर्लिंगांचें एक स्तोत्रहि प्रसिद्ध आहे. तें सर्वदा म्हटलें जातें.

नृत्य, संगीत वादनाची या देवतेला अत्यंत आवड. स्वतः ते एक महान नर्तक. नटराज हें त्यांचें रूप सर्व जगतांत प्रसिद्ध आहे. प्रत्येक महिन्यांत शिवरात्र असतेच; परंतु माघ महिन्यांत तिचें महत्व विशेष असतें; म्हणूनच तिला महा शिवरात्र असें म्हणतात. महाशिवरात्री संबंधींच्याहि अनेक कथा प्रचलीत आहेत.

कुणी त्याचा संबंध अर्जुनाशीं लावतात तर कुणीं एका किराताशीं लावतात. कांहींही असो. निष्ठेनें कुठलीही भक्ति केल्यास ती कल्याणकारक होते हेंच खरें !

भारतवर्षांतल्या कृषिवलानीं 'शिवाची' पशुपती या नावानें पूजा केली. उपयुक्त जनावरांचा तो पालनकर्ता असून वृषभ हेंच त्याचें वाहन असल्यानें त्यांनीं शिवाला हें नांव दिलें असावें.

**गोपाळकृष्ण भोबे**







अनुक्रमणिका





माघ शके १८८१ फेब्रुवारी १९६०

# ❋ आद्यशक्ति श्रीशिव ❋

आ यांच्या आराधनेंतली महान् शक्ति म्हणजे शिव. उत्पत्ति आणि स्थितीचा लय करणाऱ्या त्या महान् संहारक अद्‌भुत शक्तीला शिवरूप मानून, त्यालाच शरण गेल्यानें प्रचंड उत्पातांपासून आपलें रक्षण होईल म्हणूनच आप, तेज, वायु, आकाश या विष्णुरूपांबरोबरच शिव या दैवतास प्राधान्य आलें. केवळ आर्यांनींच हें दैवत पूज्य मानलें असें नव्हे, तर अनार्यहि रुद्रभक्तीचें महत्त्व मानूं लागले.

वेद त्याला शिव म्हणत नाहीं. ऋग्वेदांत त्यांचा महिमा रुद्र या संज्ञेनेंच वर्णन केलेला आहे. प्रजापतीची पत्नी उषा, हिला एक मुलगा झाला. जन्माला आल्यापासूनच त्यानें भयानक असा आकांत करायला सुरवात केली. विरंचीनें त्याला त्याचें कारण विचारतां तो म्हणाला, "हे प्रजापते, माझ्यांतल्या सर्व अमंगलाचा प्रथम नाश कर आणि माझें नामकरण कर." प्रजापतीनें त्याला वरदान देऊन त्याचें 'रुद्र' असें नांव ठेवलें. जन्मल्यापासून प्रचंड असें रोदन करणारा म्हणून तो रुद्र !

विष्णुपुराणांतहि एक विलक्षण कथा आहे. एकदां ब्रह्मा आणि शिव यांच्यांत अधिक श्रेष्ठ कोण ? याबद्दल आपसांत घोर युद्ध झालें. या युद्धांत शिवानीं ब्रह्मयाचें एक शीर कापून घेतलें; परंतु ज्या हातांत त्यानीं तें शीर कापून घेतलें होतें तो हातच लुळा झाला. या घटनेमुळें शिव स्तंभित झाले. ती संधी साधून ब्रह्मयानें मायेनें एक वीर निर्माण करून त्याला शिवावर सोडला. शिवांना त्यांचा प्रतिकार करतां येईना. ते धूम पळाले आणि त्यांनीं वाराणशीला आश्रय घेतला. आणि इथें राहून त्यानीं ब्रह्महत्येच्या पातकाचें क्षालन केलें. त्यांच्या रूपांत अधिक भयानकपणा आणला तो अनार्यांनीं; त्यांनीं त्यांना वनराजाचें रूप दिलें. त्यांच्या गळ्यांत रुंडमाळा घातल्या आपल्या प्रमाणें त्यांना मृगचर्म नेसवलें. भीतिप्रद अशा जागीं रक्षणकर्ता म्हणून त्यांच्या प्रतिमा स्मशानादि ठिकाणीं स्थापन केल्यानें स्मशानावर त्यांचें स्वामित्व आहे असा लौकिक झाला.

यजुर्वेदांत व महाभारतांत त्यांच्यासंबंधी अनेक कथा आहे. तसेंच इशानसंहिता, शिवपुराण आदि ग्रंथांतहि शिवाचें श्रेष्ठत्व सांगणाऱ्या कथा आहेत. किंबहुना ब्रह्मा, विष्णुपेक्षांहि शिवमहिमा मोठा आहे. असेंहि त्यांत सांगितलें आहे.

समुद्रमंथनापासून जें हलाहल निघालें, तें समुद्रांत किंवा पृथ्वीवर कुठेंही टाकलें असतें, तर सर्वनाश झाला असता; सर्व देव घाबरून गेले, त्यानां कांहीं युक्ति सुचेना अशावेळीं एकच रक्षणकर्ता पुढें आला तो म्हणजे श्रीशिव, त्यानीं तें कंठांत धारण केलें, आणि सर्व जगताचें विनाशापासून रक्षण केलें, त्या वेळेपासून त्यानां नीलकंठ हें नांव पडलें.

अपार शक्तिशाली अशी ही देवता तितकीच अपार भोळीहि आहे. सुरांप्रमाणें असुरानींहि उग्र भक्तिनें त्यानां वश करून घेऊन, बेफाट वर मिळवले. आणि त्यांच्या वरप्रभावाने भूमिभार झालेल्या त्या असुरांच्या निर्दालनासाठीं विष्णूला वारंवार अवतार घ्यावे लागले, परंतु या भोळ्या देवतेला पश्चात्ताप म्हणून कधींही झाला नाहीं. या अतिभोळेपणामुळें झालेल्या घोटाळ्यानीं देवांना खदखदून हंसवणारे विनोदी प्रसंग मात्र भरपूर निर्माण झाले. भस्मासुरामुळें झालेला गोंधळ आणि हलकल्लोळ सर्व प्रसिद्ध आहे.

रावणाच्या अचाट भक्तीला भुलून, प्रसन्न होऊन, स्वपत्नीही त्याला द्यायला मागें पुढें पाहिलें नाहीं. एकदां तर आत्मलिंगहि खुशाल देऊन टाकलें. आणि या संकटाचें निवारण करतांना बिचाऱ्या गणपतीला आपला एक दांत गमवावा लागला. प्रसन्न झाल्यानंतर, एकदां त्यांनी 'वर माग' असें म्हटल्यावर भक्तानें मागितलेला वर कितीही बिकट असो, त्याचा सारासार विचार केल्याखेरीज 'तथास्तु !' म्हणून अंतर्धान पावल्याखेरीज त्यांना चैन नाहीं.

( पृष्ठ ६ कॉलम २ वर पहा )

कुठें रूपाचा अटकर बांधा आणि
कुठें हिचे सुटलेले स्थूल शरीर !
कुठें उमलत्या फुलाप्रमाणें सतेज
आणि टवटवीत असलेली रुपा
आणि कुठें पाकळ्या गळूं
लागलेल्या फुलाप्रमाणें दिसणारी
गलीतगात्र बाई ! शीः शी !

अच्युत बर्वे

# रूप

मी हॉटेलमध्यें शिरलो तेव्हांच माझ्या लक्षांत आलें कीं माझा अंदाज साफ चुकला आहे. बभ्रा होऊं नये म्हणून एखाद्यानें गांवाबाहेरच्या देवळांत संकेत ठरवावा आणि त्याच दिवशीं तिथें जत्रा असावी तसें माझें झाले होते. तिच्या माझ्या सहवासात कुणी ओळखीची खूण पटवून रंगाचा बेरंग करूं नये म्हणून मुद्दाम मी हे जुहू किनाऱ्यावरचे हॉटेल पसंत केले होते. पण भरंवशाच्या मित्राने आयत्यावेळीं तोंडघशीं पाडावे तसा ह्या 'सी साईड इन्' ने मला दगा दिला होता. तिची माझी मैत्री वाढीला लागली आणि एकांतासाठीं मी झुरूं लागलो तेव्हांच मी तिला ह्या हॉटेलविषयीं सुचवले होते. पण डोळे मोठे करून तिने माझ्या बेताला मोडता घातला होता. तेवढ्या वेळेपुरती मी पड खाल्ली होती. पण संधी मिळेल तेव्हां तेव्हा समुद्रकांठच्या ह्या संकेतस्थानाचा उल्लेख करून मी तिची आर्जवें केली होती. प्रलोभनें दाखविली होती. सुरक्षतेविषयीं आश्वासने दिली होती. माझ्या चिकाटीला यश आले होते आणि मी सांगेन त्या ठिकाणीं यावयास ती तयार झाली होती. 'मैत्रिणीकडे जाते' म्हणून तिने घराबाहेर पडावयाचे आणि जुहूला येऊन सबंध दिवसभर माझ्या सहवासात रहावयाचे तिने मान्य केले होते. दोघानी बरोबर न निघतां मी आधीं निघावे आणि तिची मार्गप्रतीक्षा करीत 'सी साईड् इन्' मध्यें बसून रहावें हें सगळें ठरले होते. ठरल्याप्रमाणें मी जुहूला आलो होतो, हॉटेलमध्यें शिरलो होतो आणि अखेरीला ह्या हॉटेलनेच मला टोकर दिली होती.

माडांच्या सावलींत आणि समुद्राचे गाणे ऐकतां ऐकतां नेहमी पेंगुळणारे हे हॉटेल आज ताजेतवाने झाले होते. दर्शनीं भागावर रंगीबेरंगी पताका फडफडत होत्या आणि आतल्या बाजूला छताला फुगे लटकत होते. मधला हॉल संमिश्र आवाजाने सशब्द झाला होता आणि हॉलच्या पलीकडे, समुद्राच्या बाजूला असलेल्या जागेत मांडलेली टेबलें भरलेली दिसत होती. हॉटेल इतके गजबजलेले पाहून मीं थोडाफार भांबावलो. दबकत दबकत पुढें झालो आणि रॉबर्ट

कुठे दिसतो का ते पाहूं लागलो. बिलीयर्ड टेबलजवळ तो दिसला तेव्हां मी पुढें झालो आणि म्हटलें, " गुड मार्निंग "

माझ्या अभिवादनाला प्रतिअभिवादन करीत त्याने मला बाजूला घेतले आणि विचारले, " अरे, आज तू एकटाच कसा ? "

आणि मी कांहीं उत्तर देण्यापूर्वींच त्याने माझा हात हातात घेऊन म्हटलें " थँक यू ".

माझ्याबरोबर दुसरें कोणी नाहीं हें पाहून रॉबर्टला आश्चर्य वाटणे साहजिक होते. प्रत्येकवेळीं मी जुहूला येतो आणि त्याच्या हॉटेलचा आश्रय घेतों त्यावेळीं माझ्याबरोबर नवे माणूस असतें हें त्याला ठाऊक होते. किंबहुना, बरोबर असलेल्या बाईमुळेंच मी इतक्या दूर त्याच्या हॉटेलांत येतो हेहि त्याला ठाऊक होते. त्यामुळेंच मला एकट्याला पाहिल्याबरोबर त्यानें विचारले होते, ' आज तू एकटाच कसा ? ' आणि मला असा एकटा आलेला पाहून त्याने सुटकेचा श्वास टाकून माझे आभार मानले होते. हॉटेलातल्या सगळ्या खोल्या भरलेल्या असल्यामुळें तो असें बोलत असावा असें वाटून मी विचारले, " आज ही एवढी गर्दी कसली ? "

" आज सुटीचा दिवस आणि त्यांतून क्रि'स्-मस् "

तो म्हणत होता ते खरे होते. संकेत ठरवताना ह्या गोष्टी माझ्या ध्यानांत आल्या नव्हत्या. विकारांच्या आधीन झालेल्या माणसांचा सारासार विचार लोप पावतो हेंच खरें ! नाहीतर, व्यवहारांत सावधगिरीनें वागणाऱ्या माझ्यासारख्या माणसाच्या हातून अशी चूक झाली नसती. आता रूपा आली कीं तिची कशी समजूत घालावी असा विचार करीत मी म्हटलें, " रॉबर्ट, नेहमीसारखी तू मला मदत केलीस तर मला फार आनंद होईल—"

" पण तू तर एकटाच आहेस " त्याच्या ह्या बोलण्यावर मी हंसलो आणि माझी मैत्रीण येणार असल्याचे सांगून टाकले. ' आता आली का पंचाईत ! ' असा त्याने चेहरा केला तेव्हां काकुळतीला येऊन मी म्हटलें, "रॉबर्ट, नाही म्हणूं नको–फार उपकार होतील तुझे " माझ्या काकुळतीला येण्याने तो विरघळला असावा. कांहींतरी तजवीज करायचे आश्वासन देऊन त्याने म्हटलें, " पाठीमागच्या बाजूला जाऊन बस " आणि खुषीत येऊन मी चालू लागणार तोंच त्याने मला जवळ बोलावले आणि हलक्या आवाजांत विचारले, " पण तुझ्या ह्या मैत्रिणीला पाठीमागच्या बाजूने यायला सांगितलं आहेस ना ? " त्याच्या ह्या प्रश्नाने मला एकदम हंसू येणार होतें. पण येणारे हंसूं दाबून टाकीत मी म्हटलें, " ते सगळं आता मला पाठ झालं आहे " आणि मी हॉलच्या दिशेने चालूं लागलो. रॉबर्टच्या प्रश्न ऐकून मला हंसू येणे अगदीं साहजिकच होते. माणूस कितीही व्यसनी असला किंवा पोट जाळण्यासाठीं तो अशिष्ट मार्गाचा अवलंब करीत असला तरी तें कुणाला कळूं नये म्हणून त्याची धडपड चालू असते. आडबाजूला असलेले हे रॉबर्टचे हॉटेल कशाच्या जोरावर चालते ते सगळ्याना ठाऊक असण्याची शक्यता होती. पण ठाऊक असले तरी त्याची वाच्यता होऊं नये अशी रॉबर्टची अपेक्षा होती. त्यामुळेंच, माझ्यासारखा कुणी मैत्रिणीला घेऊन घटकाभराच्या मौजेसाठीं आला तरी त्याने चार-चौघांच्या देखत मिरवत न येतां, पाठीमागच्या बाजूने गुपचूप यावें अशी त्याची सांगी असे. त्याची ही सूचना लक्षांत ठेवून मी वेळोवेळीं तसा वागलो होतो. सांगितल्याबाहेर मी वागत नाही हें त्याला ठाऊक होते तरीही प्रश्न विचारून त्याने मला सावध केले होते. त्याच्या ह्या अति सावधगिरीचे मला हंसू येणार होते. पण तें मी वेळींच आवरले होते. तसें पाहिलें तर रॉबर्ट घेत असलेल्या ह्या सावधगिरीला हंसायचा मला तरी काय अधिकार होता ? मीही असाच सावधगिरीने वागत नव्हतो काय ? नटारंगी बायांबरोबर उंडारून, ' मी त्यातला नाही ' हें शहाजोगपणें सांगता यावे म्हणूनच असें आडमार्गावरचे हॉटेल मी पसंत करीत नव्हतो काय ?

हॉलमधून मी बाहेर समुद्राच्या बाजूला आलो आणि रिकामे टेबल कुठें दिसते का ते पाहूं लागलो. बसल्या जागेवरून दूरवरचे दिसेल अशी जागा मी हेरली आणि झपाझप चालत पुढें झालो. मला मिळालेली जागा मोठी छान होती. मी सांगितलेल्या मार्गाने येणारी रूपा, हॉटेलला वळसा घालून वाळूवर आल्याबरोबर मला दिसणार होती. ती दिसल्याबरोबर, मी पुढें होणार होतो. हॉटेलमधें गर्दी असल्याचे सांगणार होतो. खुलासा करणार होतो. आणि मी सांगितलेले ऐकून डोळे मोठे करून आणि नाक उडवून ती म्हणणार होती, " तुझं नेहमी असंच असतं—"

' पण बंदा सेवेला नेहमी हजर असतो. आणि पुढें झुकून मी नाटकीपणाने म्हणणार होतो, ' राणीसाहेबा, सारी व्यवस्था झाली आहे. आपण पुढं व्हावं ' आणि माझं हें बोलणं ऐकून माझ्याबरोबर तीही हंसणार होती. ह्या मनोराज्याच्या भरांत मी तिला हॉटेलमधे घेऊनहि आलो असतो पण एवढ्यांत ज्यूक बॉक्समधली रेकार्ड बदलली आणि मी भानावर आलो. आजूबाजूला बसलेल्या माणसांकडे सावधपणाने पाहूं लागलों.

( पान ४१ वर चालू )

नव्या वर्षाचे नवे बेत : संपादक



आणखी एक मासिक काढणार
—" म्हाताऱ्यांसाठीं "

*.पांडू निघून गेला. आधींच पांच-सहा फूट उंच असलेला पांडू मला आमच्या पिंपरणीएवढा उंच झाल्यासारखा वाटला. आपल्या सहस्र हातांनीं तो साऱ्या स्त्रीजातीची अब्रू घेतोय असं दृश्य माझ्या डोळ्यांसमोर उभं राहिलं.—*




आमचे रंगोबा म्हणजे आमच्या अण्णा गाडेकरांचं थोरलं चिरंजीव. स्वारी नुकतीच पंचविशींत आलेली. पंचवीस हें वयच मोठं खोटं. भल्या माणसांना गोत्यांत आणणारं, चांगल्या मुखण माणसाला गाढव करणारं आणि त्याच्या आयुष्याचा उकिरडा बनवणारं-!!

रंगा आपल्या बापासारखाच उंच आहे. चांगला सहा हात उंच आहे. रस्त्यानं तो चालूं लागला म्हणजे एखाद्या ताडीच्या झाडाला पाय फुटून तें चालूं लागल्यासारखं वाटतं. आणि विशेष म्हणजे कमरेपासून खालीं तो उंच आहे. अंगलट मात्र आहे शेलाटीच. चेहेरा लांबडा. अन् त्याच्यावर सिनेमांतल्या नटासारखं केसांनीं भरलेलं डोकं. रंगाचे केंस आहेत कुरळे. तेलपाणी नसल्यानं ते कधीं चापून-चोपून बसत नसत. पालखीच्या गोंड्यागत रंगाचं डोकं सदां फुललेलं. त्याचे कान मात्र विचित्र आहेत. गणपती देवासारखे फताडे. सतत कुठला तरी कानोसा घेणारे.

दिसायला कांहीं तो टाकाऊ नाहीं. निमगोरा रंग, सरळ नाक आणि लांबट हनुवटी त्याच्या चेहेऱ्याला शोभून दिसायची. त्याच्या उजव्या डोळ्यांतील पांढऱ्या भागावर मात्र कसला तरी काळा डाग आहे. त्यामुळं त्याच्या दृष्टींत उगीचच कारुण्य भरल्यासारखं वाटायचं. त्याच्या डोळ्यांत बघतांना मला त्याची कींव यायची. उगाचंच कुठंतरी खुपायचं.

रंगोबा पिकटे हें कांहीं त्याचं खरं नांव नाहीं. आमच्या कंपनींत तो आमच्या चेष्टेचा विषय असे. कुणीकडूनतरी त्याला सारखा डिवचायचा. त्यासाठीं वाटेल त्या साधनाचा आणि प्रकाराचा आम्हीं उपयोग करीत असूं. रंगोबा पिटके हा त्यापैकींच प्रकार आहे. त्याच्या जन्मानंतरचं पहिलं सोडून आम्हीं त्याचीं खेरीज सहा बारशीं केली. रंगराव लालखान पिटके हें आमचं त्याला पहिलं नामाभिधान. त्याला त्या नांवाचा फार राग असे. त्याच्या मूळच्या नांवावर आम्हीं सारवण घालून टाकलं होतं. त्याचं खरं नांव आहे पांडुरंग. पांडुरंग गाडेकर. आम्हीं त्याला म्हणत असूं ' पांड्या—लांड्या. '

एकदां दुपारच्या वेळेला मी पांडूच्या घराकडे गेलों. पहिल्याच खेपेला मी त्याच्याकडं गेलों होतों. घराच्या पायऱ्या चढून मीं दाराच्या चौकटींतून डोकं आंत खुपसलं. बाहेरच्या सोप्यांत कुणींच नव्हतं. भिंतीकडेला एक सतरंजी टाकली होती. पोटाला घड्या पडलेला एक तक्क्या भिंतीला टेकून त्यावर मुक्यानं बसला होता.

मीं इकडं तिकडं मुंडकं हलवून हांक दिली—'पांड्या आहे का घरांत ?'

अन् मग अंधाऱ्या माजघरांतून दणदण पाय आपटीत पांड्याचा म्हातारा माझ्यापुढं येऊन उभा टाकला. डोक्याला गुंडाळलेला जरीकाठी रुमाल, ते घारे डोळे आणि पपईच्या झाडागत त्यांची उंची बघून मी हादरलोंच. बोक्यागत मिशा फेंदारून ते माझ्यावर फिसकारले—'

'कुनाचं चिरंजीव आपन ?'

कळ दाबल्यासारखा मी बोललों, 'मी...गोवईकरांचा ..'

'म्हंजे गोवेकर वकिलाचं कां ?'

'होय.' मी मान हलवली.

'मंग, वकिलानं ह्येच शिकावलं कां ?'

पांड्याचे वडील कशाबद्दल बोलताहेत तें मला कळलं नाहीं. मान वाकडी करून लेण्यासारखा मी उभा होतों. ते बोलूं लागले.

'चांगलं देवाचं नांव, आन् पांड्या कशापायीं म्हनायचं ? पांडुरंग म्हनावं, लईच झालं तर पांडू म्हनावं पांड्या काय ? पांडुरंगा, तुझ्याकडं कोन आलंय बग...'

कानांतील भिकबाळी डुकुडुकु हलवत ते आंत निघून गेले. मला धडा देऊन मग त्यांनीं पांडूला बाहेर पाठविला. पांड्यानं हें सारं आंतून ऐकलं होतं. तो हिरड्या दाखवीत बाहेर आला. तेव्हांपासून त्यांच्या देखत मी पांड्याला 'पांडुरंगा' म्हणायचों.

पांडूच्या वडिलांचा चोळखणाचा धंदा असे. पंढरपुरी बाणाचे खण आणि जुन्या पद्धतीची नऊवारी लुगडी ते आज कितीतरी वर्षं विकत आले होते. चार-पांच माणसांचा प्रपंच ते त्याच्यावरच चालवीत असत. आपल्या दोन्हीं मुलांची मॅट्रिकपर्यंतची शिक्षणं त्यांनी त्या धंद्याच्या मिळकतीवर केली. आपल्या थोरल्या मुलीचा संसार त्यांनी त्याच पैशांत उभा केला होता. पेठेंतल्या थोरा-मोठ्यांच्या घरीं त्यांचं खातं होतं. प्रतिमासाला ते त्या त्या घरीं जात असत. पाठीवर खणा-लुगड्यांचं ओझं बांधून पांडूचे म्हातारे वडील दारोंदार हिंडत. मागणी असेल तिथं माल नेऊन टाकीत. हुज्जत घालत. नको असेल तिथंहि माल घेतला जाई. पांडूचे वडील उजळल्या चेहऱ्यानं घराकडं निघून जात. महिन्या भरांत खपलेल्या मालाचे पैसे मिळत.

पांडूचा आणि माझा दोस्ताना जमला तो याच-वेळीं. पांडूचे वडील आमच्याकडं खण, लुगडी टाकायला येत.—आंतल्या सोप्यांत ते आपलं भलं मोठं गाठोडं सोडून बसलेले असत. मिष्टास वाणीनं नाना वाण दाखवीत असत. आणि त्यांच्याभोंवतीं आमच्या घरांतील स्त्रियांचा गराडा पडलेला असे. 'हें' नाहीं 'तें' करण्यांत तास तास निघून जात. नुसता कलकलाट. आंत पांडूचे वडील सौदा जुळवीत असत आणि त्यांच्याबरोबर आलेला पांडू बाहेर माझ्याशीं खेळत बसे.

दिवस पळत होते अन् मी पांडुरंगाचा भक्त बनत होतों !



नव्या वर्षाचे नवे बेत : पुढारी

त्यावेळीं आम्हीं सारे अगदीं अफूट होतों. घरीं काळजी वाहायला प्रत्येकाची आई होती आणि जबाबदारीचीं कामं पार पाडायला वडील होते. अंगभर कपडा, पोटभर तुकडा आणि डोळेभर झोंप असा त्या वेळचा आमचा निर्मळ आयुष्यक्रम असे. डोक्यावर कसलंच ओझं नव्हतं. अगदीं साधं जीवन आम्हीं जगत होतों. मी, लंगड्या कासाराचा बंड्या, पायधूळ बगाड्याचा म्हवन्या अन् पांड्या ! एकत्र खेळायचों, दंगाधोपा करायचों, शिवीगाळ, मारामारी सारेच नफ्यातोट्यांत चालायचे. पांड्याला आम्हीं फार छळला. फार म्हणजे अति. शेवटीं तो चिडायचा. दोन दोन दिवस आमच्याशीं पुढं बोलत नसे तो.

अण्णा सोनाराच्या घरीं तेव्हां आमची बैठक असे. बैठक कसली, अड्डाच केला होता आम्हीं तो. सदोदित आम्हीं तिथं गाडलेले होतों. आजच काय पण त्या काळांतहि सातान्यांत रयत-सेवकांचं लई पीक. त्या पिकांत पांड्यासारखा अंडेल बैलहि घुसला होता. पांड्या होम-गार्डांत शिरला होता. रयतेची 'शेवा' करायला. मोठमोठ्या उत्सवाच्यावेळीं अंगावर तीं जाड खाकी कापडं अन् पायांत भलं मोठं काळं बूट चढवून पांड्या 'शेवेस शिद्ध' असे. त्या संस्थेंत प्रवेश करून घेण्याचं पांड्याचं हेंच 'न्हदय' होतं. वर्षांतून दोन वेळां नवीन 'ड्रेस' प्रत्येक होम-गार्डाला मिळत असत. पांडू त्या कपड्यांसाठीं रयतेची सेवा करायचा. वर्षभराची त्याची कपड्याची ददात त्या जाड कापडांनीं मिटवली होती. वाटेल तसे ते कपडे पांड्या ताबलायचा.

भर उन्हाळ्याचे दिवस होते ते. कडक उन्हानं जिवाची नुसती उलाघाल होत होती. साऱ्या अंगांतून लाह्या फुटतात कां काय असं वाटायचं आणि अशा भर दुपारीं पांड्या आपला होमगार्डाचा जाड पोषाख चढवून सोनाराच्या घराकडे आला होता. सोनार आपल्या कामांत होता. कुणाचे तरी वाळे करण्यांत तो दंग झाला होता. पांड्या कांहीं न बोलतां माजघरांत गेला. अंगावरचा जाडगा सदरा त्यानं खुंटीला अडकवून ठेवला. देवाशेजारच्या घागरींतलं गार पाणी तो घटाघटा प्याला. भिंतीकडंला असलेलं पोतं त्यानं नीट केलं. आणि घामानं चिकट झालेलं आपलं उघडं आंग त्यानं पोत्यावर झोकून दिलं. उशाला जात्याची तळी घेऊन तो थंड माजघरांत निवांत झोंप घेऊं लागला.

मी आणि बगाड्याचा म्होन्या येऊन बघतों तर पांड्या झोंपलेला. कमरेखालीं फक्त खाकीं पांटलोण, बाकी उघड्या अंगानं पांडू गाढ झोपला होता. आम्हीं त्याच्या साऱ्या देहावरून एकदां नजर फिरवली. शिंप्याच्या उघड्या कात्रीसारखा पांडू दोन्ही हातपाय फाकून निद्रिस्त झाला होता. त्याचे डोळे मेलेल्या माणसासारखे अर्धवट उघडे होते. पांडू संपूर्ण जिता असल्याची ती खूण होती. ती त्याची जात्याच खोड होती. आम्हीं आज पांड्याला चांगला घोळसायचं ठरविलं.

पांडूनं काढून ठेवलेला शर्ट आम्हीं खुंटीसनं काढला. नुकताच त्यानं तो धोब्याकडून आणला

अनुक्रमणिका



# तुकोबाचा देहूगांव

तुकोबाचा देहूगांव वाट धुळीनें भरली
चालताना विलक्षण हाक आली गार ओली
मावळत्या भास्कराला प्रार्थितसे इंद्रायणी
उगवत्या चांदोबाला आठवलें काय मनीं
गावावरी दाटलेल्या पाहतांना धुक्यांतुनी
भंडाऱ्याच्या डोंगरांत शहारली वाट जुनी
देहूगावाच्या धुळीला उग्र गुलाबाचा वास
निवलेल्या हवेमध्यें अध्यात्माचा गूढ श्वास
माळरानांत अफाट शांत फिकटले रंग
शेताच्या ललाटावर कांही फि ते निस्संग
आ ाशाच्या गाभाऱ्यांत दूर वाजतो मृदुंग
विठोबा रुक्म.ई .ाशी कोण गातसे अभंग

*— शिरीष पै*

होता. शाबुदाण्याच्या कडक इस्त्रीनं तें कापड अधिकच ताठ झालं होतं. शेर दीडशेर वजनाचा तो सदरा आम्हीं सोनाराच्या पाण्याच्या हंड्यांत बुचकाळला. चांगला भिजवला नीट भिजंना म्हटल्यावर मी अन् बगाड्या त्याच्यावर पाळीपाळीनं नाचलों. खळ्यांतल्या जोंधळ्यागत आम्हीं तो सदरा तुडविला. अन् बाहेर परड्यांतल्या मातींत नेऊन घोळसला. पार पोतेरं केलं. सदरा तिथंच टाकून आम्हीं घाईघाईनं आंत आलों. पांड्याची झोंप रंगांत आली होती.

झोपलेल्या पांड्याचे दोन्हीं हात आम्ही हलकेंच उशालगतच्या जात्याच्या खुण्टाला बांधले. आणि पुढच्या तयारीला लागलों. पांडूचे अस्ताव्यस्त पसरलेले लांबडे पाय मी हलकेंच वर उचलले. गाडीच्या जूंगत ते मी तोलून धरले. बगाड्यानं देवाशेजारची पाण्याची घागर उचलली. तो माझ्याजवळ आला. पांड्याचे पाय मी धरलेच होते. पायापर्यंत आलेली त्याची खाकी पाटलोण मी फांकून धरली आणि बगाड्यानं घागरींतलं गार गार पाणी पांड्याच्या विजारींत बदाबदा ओतलं.

पांड्या स्वप्नांत कुणाचातरी मुका घेत होता वाटतं. विजारींत शिरलेलं गार गार पाणी अंगाअंगाला लागतांच तो झोपेंतच बोंबलला, 'अगायायायाया ऽऽ, मेलों ऽऽऽ'

पांड्यानं टक्क डोळे उघडले. मी त्याचे पाय अजून सोडले नव्हते. म्होन्याच्या हातांत अर्धवट रिकामी झालेली पाण्याची घागर अजुन तशीच होतो. पांड्याच्या ध्यानांत आलं. तेव्हांच त्यानं ताडलं. तो रागानं उठूं लागला पण त्याचे हात आम्हीं खुटाला बांधले होते. त्याच्या उठण्याच्या हिसड्यानं जात्यांत रुतलेला खुंटा सटकन् बाहेर उडाला अन् पांड्याच्या डोक्यांत ठणकन् लागला. पांडू आणखी विव्हळला. तोच खुंटा हातांत घेऊन तो आम्हाला मारायला उठला. मी पाय सोडून पळालों. बगाड्यानं उभ्यानंच पाण्याची घागर फेंकून दिली, अन् तो धांवला. जीव घेऊन आम्हीं पळालों. परड्यांतल्या वाघाटीच्या वेलाखालीं लपून बसलों. पाण्याच्या थारोळ्यांतून पांडू उठला. उघड्या आंगानं आणि ओल्या विजारीनं तो आमच्या मागं धांवत होता. आम्हीं वाघाटीच्या आडून पाहात होतों. पांड्यानं इकडं तिकडं पाहिलं. आम्हीं कांहीं त्याला दिसलों नाहीं. चिडून हातांतला जात्याचा खुंटा त्यानं प्राजक्ताच्या झाडाला फेंकून मारला. झांड थरथरलं. दोन तीन फुलं खालीं गळून पडली. पांडूनं लगालगा अंगावरची ओली विजार काढली. आधीं तो उघडा होताच. त्यांत त्यानं अंगावरची विजारहि काढली. आणि इकडें तिकडें कुणी नाहीं असें पाहून त्यानं ती प्राजक्तावर वाळत टाकली. उघड्या अंगावर चपाचपा उन्हं घेत तो आंघोळीच्या दगडावर बसून राहिला. नुसत्या लंगोटावर पांड्या बसलेला पाहून आम्हांला हंसू कोसळत होतं.

इतक्यांत अमच्या गलक्यानं जाग आलेला आण्णा सोनार हातांत सांडस धरून आम्हांला शिव्या घालत बाहेर आला.

'तुमच्या आयला, तुमच्या...' ही आण्णानं माजघरांतून घातलेली शिवी मला वाघाटीखालीं ऐकूं आली. मी भान न राहून ओरडलों--' अरे, आण्णा आला, पळा...'

पांड्या लंगोटावरच बसला होता. ध्यान लावून बसलेल्या ऋषीसारखा पांड्या कसल्या तरी नादांत बसला होता. आण्णा आला म्हटल्यावर तोहि घाबरला. हडबडून गडबडून गेला. आणि तटकन् दोन पायावर उभा राहिला. वाळत टाकलेली विजार काखोटीला मारून तो तसाच रस्त्यावर पळाला. तें दृश्य पाहून आम्हांला हंसावें कीं, रडावें कळेचना. तेवढ्यांत तापलेला सोनार चौकटींत येऊन उभा राहिला. नुसत्या लंगोटावर पळणारा तो नागवा मारुती-बघून तो भकरून हंसला. हातांतली सांडस पांड्याच्या दिशेनं फेंकून तो अंगाचा मुटका करून खालींच बसला. पोट धरून हंसूं लागला. आण्णाला मोकळेपणानं हंसतांना पाहून आम्हींहि जोरांत हंसूं लागलों. आमचा मार वांचला होता.

असा छळला आम्हीं पांड्याला !

पांडू ईश्वराचें अस्तित्व मानीत असे. त्याच्यापाशीं मागितलेलं मिळतं अशी त्याची धारणा होती. तो त्याला भावत असलेल्या सुखाची मागणी देवाला घालीत असे. त्यालीं कौल लावीत असे. तळहातावरचं मडकं फुंकत फूं फूं करीत नाचणाऱ्या नवरात्रांतल्या महालक्ष्मीला तो मोठ्या भाविकतेनं नाना प्रश्न विचारी. एकादशी करी. सोमवार करी. साईबाबाची तांब्याची अंगठीहि त्यानं अनामिकेंत अडकवली होती.

पांडूचें तें मॅट्रिकचं वर्ष होतं. मॅट्रिक झाल्यावर कुठं तरी नोकरी धरू. चार पैसे मिळवूं. भावाला शिकवूं. आईवडलाला सुख देऊं, अशी त्यावेळची त्याची मनीषा होती. ती कधींच पुरी झाली नाहीं. घरचं दारिद्र्य हातपाय पसरत होतं. धंदा बसत चालला होता. आणि

अनुक्रमणिका






वडील वृद्ध होत चालले होते. धंदा करणं त्यांना झेपत नव्हतं. पांडू अमच्याकडे येऊन कपाळाला हात लावून बसे. आम्हीं त्याला धीर देत होतों. दुसरं काय देणार ?

'आण्णा-ताईचें फार हाल होतात.' तो म्हणे.

'कशानं, रे ?' आम्हीं विचारीत असूं.

'धंदा कांहीं चालत नाहीं. पैसे येण्याचं दुसरं कांहीं साधन नाहीं. आण्णा होईल तितकं करतात. पण त्यानं कांहीं साधत नाहीं. मला दुसऱ्या कशाचं वाईट वाटत नाहीं, पण पानावर बसलं कीं, रडूं कोसळतं. आण्णांच्या पानांत नुसती कोरडी भाकरी पाहिली कीं, माझ्या डोळ्यांत टचकन् पाणी उभं राहतं...'

आम्हाला अति वाईट वाटे. पांडूचं हें बोलणं ऐकून आम्ही एकदम गंभीर होत असूं. आमच्यापैकीं एकजण अन्नाला महाग व्हावा याचं आम्हांला फार वाईट वाटे. त्याचं दुःख आमच्या गळीं दाटून यायचं. पण आम्ही तरी काय करणार होतों ? आम्हीं अजून घरट्यांतच वाढत होतों. साऱ्यांची परिस्थिति एकच होती. आम्हीं सारे एकाच पडावांतून प्रवास करीत होतों. किनारा कुणालाच दिसत नव्हता.

जड पावलांनीं दिवस जात होते. टाक्यावर टाके घालून पांडू कसे तरी दिवस जोडत होता. अन् एक दिवस ती विलक्षण गोष्ट घडली. पांडूच्या ओढाळ आयुष्यानं एक नवीनच वळण घेतलं. पांडू त्याच्यामागें फरफटत गेला.

श्रावणांतले दिवस होते ते. पावसाचा वेग आतां कमी आला होता. उंच उंच डोंगर आणि त्यांच्या पायथ्याशीं भिडलेलीं रानं आतां हिरवीगार झालीं होतीं. ऊन-पावसाचा खेळ करीत दिवस हिरव्याचार रानांवर खेळत होता. आभाळांत कुठंतरी पांढऱ्या बगळ्यांची माळ तुटून पडत होती. सूर्यदेव धारेवर गेला कीं, उगवतीला रंगीबेरंगी धनुकली आंग टाकून देई. वातावरण मोठं प्रसन्न होतं. जिकडं तिकडं आनंद खेळत होता.

सोमवारचा दिवस होता. पांडू नित्याप्रमाणें गांवाबाहेरच्या शंकराच्या देवळाकडे चालला होता. पांडूचं तें व्रत होते. दर सोमवारी कुरणांतल्या शंकराचें दर्शन घेऊन येऊन मग तो उपवास सोडत असे. आजहि तसाच चालला होता तो. कसल्यातरी विचारांत तो हळुहळु रस्ता कांपत होता. दिवस खालीं जाऊन आतां चांगला अर्धा घंटा होत आला होता. मावळतीकडून अंधार धांवत येत होता. गुरंढोरं केव्हांच घराकडं परतलीं होतीं. चुकून मागं राहिलेलं एखादं गाय-म्हसरूं डोंगरकपारींत हंबरा घालत होतं. दिवसभर हाताचे रट्टे भरून येईपर्यंत फोडलेली खडी घेऊन वडार परत येत होते. ओझीं लादलेलीं त्यांचीं गाढवं मुक्यानं रस्ता कांपत होती. त्यांच्या मागं चाललेल्या वडारणी दरडीवरून घरंगळणाऱ्या दगडागत कांहीं-तरी बोलत होत्या. कलाकला करीत होत्या. पांडूच्या अंगावरून त्या पुढं निघून गेल्या.

पांडू गांव सोडून आतां बराच दूर आला होता. म्युनिसिपॉलिटीचे कंदील आतां मागें राहिले होते, बोगद्याबाहेर तो केव्हां आला कोण जाणे. बोगद्याबाहेरच्या थंड हवेनं त्याला एकाएक शुद्ध आली. रात्र झाल्याची जाणीव झाली तसा तो झपाट्यानं चालूं लागला. लांब टांगा टाकत तो रस्ता कापूं लागला.

कुरणांतल्या शिवालयाचें तें आवार भारी सुंदर आहे. वडवृक्षा-खालीं विसावलेलं तें छोटसं देऊळ मनाला फार आल्हाद देतें. पांडूनं आवारांत पाऊल टाकलं त्याला बरं वाटलं. वडाच्या फांद्यांत कुठंतरी वटवाघूळ फडफडत होतं, बाकी सारं शांत होतं. पायांतल्या वहाणा काढून पांडूनं देवळांतल्या गारगार फरशीवर पाय ठेवला. त्याला आणखी बरं वाटलं. तो नंदीपुढं आला. देवाला नमस्कार करून घंटा वडवणार, तोंडावर हाताचं आळं करून शंकराच्या नांवाचा बुभुत्कार करणार तेवढ्यांत तो चरकला. सताड डोळ्यांनीं तो पुढं बघतच राहिला.

गाभाऱ्यांत निरांजनाचा मंद प्रकाश पडला होता. पिंडीशेजारी निरांजन तेवत होतं. शेजारीच तबक ठेवलं होतं. उदबत्तीचा सुवासिक गंध साऱ्या वातावरणांत भरून गेला होता. आणि ब्राह्मणानी ऐक सुस्वरूप बाई हात जोडून, डोळे मिटून शंकराची आराधना करीत होती. पांड्या भान विसरुन बघत राहिला. तिचा चेहरा बघायला तो पुढं वांकला. अरे ! ही त्या शेंडे भटाची बायको ! मालती ! पस्तीशींत आली होती तरी चांगल्या मुखण माणसाला तिची अंगलट भूल घालीत असे. अंगापिंडानं भरलेली ती गोरीपान बाई पांडूवर न बघतांच जादू करूं लागली. पांडूनं इकडं तिकडं पाहिलं. आतां काळोखाचं राज्य चालूं झालं होतं. एकांत तर होता !

एकाएक पांडू पुढं झाला. डोळे मिटून बसलेल्या बाईशेजारी तो गेला. आणि नमस्कार करीत असलेला तिचा बांगड्यांनी भरलेला हात त्यानं गपकन् धरला. त्या बाईनं दचकून डोळे उघडले. तिच्या-समोर शंकराच्याऐवजी पांडुरंग उभा होता. दोघांची नजर एकमेकांना भिडली. गरम श्वासांनीं पिंडीवरच्या निरांजनाची ज्योत थरथरली अन् दुसऱ्याचक्षणीं विझली. शंकराच्या लिंगाच्या साक्षीनं पांड्यानं आज फार वर्षांचा उपास सोडला होता. माली शेंडेची पूजा उधळली होती.

भटाच्या या बायकोनं पुढें पांड्याच्या आयुष्याचा पार विचका करून टाकला. वेळींअवेळीं पांडू तिच्याबरोबर फिरायचा. त्याचं साऱ्या व्यवहारांतलं लक्ष पार उडून गेलं. उन्हाळी झालेला माणूस जसा सारखा मुतायला जातो तसा पांडू लहर येईल तेव्हां मालीकडं जायचा. मालीचा नवरा गांवांतले श्राद्ध-पक्ष करीत फिरे. शांतिपाठ सांगत फिरे. आणि ही त्याची उठवळ बायको पोरांना शाळेंत पिटाळून पांड्याशीं रत होत असे. पांड्याहि तिला देवळांतल्या घाटीगत बडवायचा. वेळ-काळ कांहीं पाहायचा नाहीं. काकडी कोचतात तशी तो तिला कोचायचा. त्या सवत्सधेनूला फिरून एकदां माज चढला होता. आणि ती ह्या अंडेल बैलावर फिदा झाली होती. पांड्याहि या घड टाकलेल्या केळीला खतपाणी देत राहिला. तिलाहि तें कळसवणी पडूं लागलं.

पांडू हे त्याचे प्रसंग वेळोवेळीं आम्हांला सांगायचा. अगदीं 'डीटेल' सांगायचा. आम्हीहि पुढं कसं कसं आणि काय काय झालं हें त्याला फिरून फिरून विचारायचें. पांड्याला ह्या प्रकरणामुळें 'त्या' गोष्टींतील नजर आली होती. न्हातीचे बाल अन् खातीचे

अनुक्रमणिका







गाल तो आतां पहिल्या पहिल्या ओळखूं लागला. त्यांतले आडाखे तो आम्हांला मोठ्या 'रसाळतेनं' सांगे. 'व्याकशान' करून तो आम्हांला पुढचा पुढचा अध्याय सांगे. मांड्या घट्ट आवळून धरून आम्हीं तें ऐकायचो. पांडूचें कौतुक करायचो. एक अज्ञात हात पांडूची चित्रकथा लिहीत होता.

एवढं मात्र खरं, पांडूवर मालतीनं आपलं तन-मन-धन वाहिलं होतं. पांडू त्यांतलं फक्त तन आणि धन घेत असे. तिच्या मनाची त्यानं कधींच कदर केली नाहीं. तिच्या खऱ्या प्रेमाचा त्यानं कधींच विचार केला नाहीं. तसा विचार करण्याची त्याला कधीं जरूर पडली नाहीं. तिच्या घरींहि गरीबीच होती. लोकांनीं दिलेल्या दक्षिणेवर शेंडे भटाचा संसार चाललेला असे, पण त्यांतूनहि माली पांड्यासाठीं कांहीं कांहीं जिन्नस आणायची. कधीं शंकरपाळ्या तर कधीं चिवडा असं सारखं ती त्याच्यासाठीं आणायची. पांड्या तें आधीं खाऊन मग तिच्याशीं प्रणय करायचा.

पांड्यांची पुन्हां आम्ही थट्टा करायला सुरुवात केली. मालीच्या नांवानें आम्ही त्याला सारखे चिडवीत असूं. मनांतून त्यालाहि तें आवडत असे. डोळे मिटून तें दृश्यं तो पुन्हां डोळ्यापुढं आणायचा. आंतल्या आंत सुखावायचा.

एक दिवस आम्ही पांड्याचा 'ड्याईर' पक्का केला. मी अन् बगड्यानं सोनाराच्या माळ्यावरची एक मोठी थोरली लाकडाची फळी बाहेर काढली. सोनार कामांत आहे असं पाहून आम्हीं ती गुपचूप खालीं आणली आणि रंगीन खडूनं त्याच्यावर एक 'बोर्ड' रंगविला—

येनार! येनार!! येनार!!।
पांडोबा खनाळ यांचा झक तमाशा येनार!
नवीन वग आनी सुरेल संगीत बारी!!
ढोलकीवाले——पांड्या शिंपाड, सोंगाड्या——रंग्या पिटके
डॉन्सर——माली सातारकरीन ('दे दनादन' फेम)
पेश करनार——रंगलाल लालखान पिटके.
तारकेवर ध्यान ठिवा!!!

असा मजकूर सुवाच्य अक्षरांत रंगवून बाजूला त्या भटाच्या बायलीचं वेडेवांकडे हात केलेलं एक चित्रहि काढलं आणि खालच्या बाजूला कोंपऱ्यांत 'प्येंटर बगाडे' असंहि लिहून ठेवलं आणि ती





अनुक्रमणिका

रंगविलेली पाटी आण्णा सोनाराच्या घराच्या भिताडाला टेकवून ठेवली. दूर उभे राहून आम्हीं बघत राहिलों.

झालं, थोड्याच वेळांत सोनाराच्या घरापुढं लोक जमूं लागले. म्हातारे–कोतारे अन् तरणीं पोरें ती जाहिरात पुन्हां पुन्हां वाचूं लागले. नाना प्रश्न आपसांत टाकूं लागले. कुणी पिचकाऱ्या टाकीत तिथंच बूड टेकलं. बराच वेळ गप्पांचा घोळ झाला. सोनाराच्या घरापुढं लोकांनी नुसती जत्रा भरविली. जणूं कांहीं फड उभाच राहिला होता.

ह्यावेळपर्यंत अण्णा सोनाराला कशाच्याच पत्ता नव्हता. लोकांचा गलका वाढल्यावर सोनाराचा ठोके मारणारा हात एकाएकीं थांबला. हातांतला हातोडा ऐरणीवर ठेवून सोनार उघड्यानंच बाहेर आला. गर्दींत शिरून तो जाहिरात वाचूं लागला. डाव्या हातांत धोतराचा गळाठा धरून उघड्या तोंडानं त्यानं सगळी पाटी वाचली. सोनाराच्या नजरेंतून आमचं नांव सुटणार होय? पेंटरचं नांव वाचल्या वाचल्या तो एकाएकीं ओरडला, 'ह्यांच्या आयला, ह्यांच्या, भडवे माजलेत...'

असं म्हणून त्यानं रंगविलेली पाटी आंत नेली. लोक सोनाराकडं पाहूं लागले. त्यांना कांहीं कळेना. 'कां वं आसं?' म्हणून त्यांनीं विचारलं. सोनार त्यांच्यावर तरकला, 'चला चालते व्हा, काय तमाशा हाय व्हय लोकानुं!'

'मंग, बोरड कंचा लावलाय्?' कुणीतरी आवाज दिला.

'कुनी लावलाय?' सोनार भडकला,

'आमाला इचार...!' कुणीतरी तेल ओतलं.

बराच वेळ लोकांनीं रिंगण धरलें. त्यांनीं सोनाराला खुळ्यांत काढला. लोक निघून गेले. गर्दी पांगली, थोड्या वेळानं पांडू सोनाराकडं आला. आल्याबरोबर आण्णा सोनार त्याच्यावर बरडला.

'आदी भाईर हो, भडव्या...'

पांडूला कांहीं कळेना. तो केंविलवाणें म्हणाला, 'पण आण्णा, मी काय केलं?'

'नांवाजलेला गुरव देवळांत हागला अन् ताप झाला येचाला. तुमी भाईर झंगट करा आन् आमाला ताप द्या...'

'पण आण्णा...'

'पयला भाईर हो.'

पांड्याला कांहीं न बोलूं देतां सोनारानं दोन लाथा घालून त्याला हांकून लावला.

या साऱ्या सांवळ्या-गोंधळांत आमची मॅट्रिकची परीक्षा जवळ आली आम्हीं सारे एकदमच बसलों. रात्रपाळी करून कसा तरी अभ्यास केला. आणि परीक्षेला बसलों. फार दैना झाली आमची. 'पेपर उत्तम गेलेत' असं लोकांना आम्हीं सांगत होतों. आमचं आम्हीं मनांत जाणून होतों. तीन अक्षरं आमच्या चौघांच्या डोळ्यापुढं नाचत होतीं.

परीक्षेचा निकाल लागला. आमच्या तिघांच्या सारे दांड्या उडाल्या होत्या. प्रत्येकीं चार चार विषयांत आम्हीं नापास झालों होतों. कासाराच्या बंड्याला परीक्षेला बसायला परवानगीच मिळाली नाहीं. पांडू तर नापास झालाच पण मीहि नापास झालों. बगाड्या तेवढा आमच्यांत पास झाला होता.

एक रात्र आम्हीं सारे सोनाराकडे गंभीरपणें जमलों. 'असं कसं झालं?' याचा आम्हीं एक चित्तानं विचार केला. आण्णा सोनारानंहि आम्हांला धीर दिला. परीक्षेला पुन्हां बसण्याचा पोक्त सल्ला दिला. आम्हीं आपापल्या उद्योगाला लागलों. मी पुन्हां अभ्यासाला लागलों. कासारानं 'परीक्षेंत कांहीं अर्थ न्हाई' म्हणून आपल्या दुकानची वाट धरली. पांडूनंहि दुसरें दिवशीं चांदीच्या देवाला नमस्कार करून आपलं खणाचं बारदान उचललं आणि तो बाजारांत बसला. नाईलाजानं त्याला आपला चोळखणाचाच धंदा करावा लागत होता. डोक्यावर पांढरी टोपी घालून तो एका मोठ्या दुकानच्या फळटावर दिवसभर खण विकत बसे. दिवस खालीं गेला कीं, दिवसभराची

(पान ३२ वर पहा)



अनुक्रमणिका




# आरंभ आणि अखेर

आज सकाळपासून मी कांहीं जुन्या कादंबऱ्या चाळत बसलों होतों. त्यांतली कांहीं कांहीं पुस्तकें तर खूप जुनी होतीं. त्यांची पानें पिवळीं पडलीं होतीं, आणि नुसतें पान उलटलें तर त्याचा तुकडा हातांत येत होता. जुन्या पुस्तकांना जो एक खमंग, थंड सुवास येत असतो तसा त्या पुस्तकांना येत होता. अगदीं 'मंजुघोषा' 'मोचनगड' 'विचित्र-पुरी' इतकी तीं पुस्तकें जुनीं होतीं. हीं पुस्तकें प्रसिद्ध झाली, त्याला आतां कित्येक दशकें उलटून गेलीं असतील. त्यापैकीं बहुतेक पुस्तकांचीं नावेंहि आज कुणाला ठाऊक नाहीं. आणि कांहीं पुस्तकांचीं नावें केवळ जाणत्या वाचकांना तेवढीं ठाऊक असतील. तरीहि तीं जुनी पुस्तकें चाळतांना मला मोठी मौज वाटत होती. खरंच सांगायचं तर ती पुस्तकं मला तशी 'जुनी' वाटतच नव्हतीं. त्यांतल्या कितीतरी गोष्टी मला नव्याच वाटत होत्या. नव्या कादंबऱ्यांवरील वेष्टनावर धरणे धरून बसलेल्या त्याच त्या भडक बाया पाहून मी विटलों होतों. पण ह्या पुस्तकांना मुळी वेष्टनेंच नव्हतीं. तर तिथें बाया कुठून असतील ? हा अनुभव मला अगदीं नवा आणि आनंददायक वाटला. बायकांचे मुखपृष्ठावरचे मुखडे पाहून मी कंटाळलों होतों. तशांत मुखपृष्ठावर केवळ पुस्तकाचे नांव तेवढें असलेल्या बाळबोध कादंबऱ्या माझ्या हातांत पडल्या. त्यांचा तो साधेपणाच मला मोठा सुंदर वाटला. मी कांहींतरी वेगळे व नवे पाहतों आहे असें मला वाटूं लागलें. आज वेष्टनाविना पुस्तक दिसणें दुरापास्तच झालें होतें. पुस्तकांवर आतां आम्हीं वेष्टनें चढवीत होतो. आणि वस्त्रांचेहि वेष्टन नसलेल्या बायकांच्या चित्रांनीं तीं सजवीत होतों. पण ज्या काळांतल्या कादंबऱ्या मी पहात होतो त्या काळांत बायकांचा उपयोग इतक्या बाजारूपणें केला जात नव्हता. त्या मुखपृष्ठाचें कौतुक करीत मी कांहीं पानें उलटलीं तों आंत एका प्रकरणाच्या प्रारंभींच खांद्यावर कुऱ्हाड घेतलेल्या दणकट माणसाची छबी माझ्या दृष्टीस पडली. ही छबी मी फार वर्षों-पूर्वीं पाहिलेली होती. आतां प्रकरणाच्या प्रारंभी कुणी असे छोट्या चित्रांचे ठसे वाप-रीत नाहींत. आतां मुळीं कादंबऱ्यांतून "सुलतानगडावर" "किल्ली आणली" ह्यासारखी नांवनिशीवार प्रकरणेंच नसतात. पण हें पुस्तक पाहतांच माझी आठवण चाळवली. ह्या कादंबरींतल्या एका प्रकरणाचे शेवटीं फांदीवर बसलेल्या दोन पाखरांचा ठसा असला पाहिजे. मी भराभर पानें चाळलीं. ते दोन्ही ठसे मला सांपडले. एखादा शोध लागल्याचा आनंद मला झाला. सजावटीची ही पद्धत कांहीं वाईट नव्हती. मला तर ती चांगली वाटली होती. मी आणखी एक कादंबरी उघडून पाहिली. त्या कादंबरींतल्या कुठल्याहि प्रकरणाचें पहिलें अक्षर पहा. तें मोठें ठसठशित आणि वेलबुट्टीदार होतें. त्या काळच्या एखाद्या वाचकानें आमच्या आजच्या कादंबऱ्या चाळून पाहिल्या तर त्या त्यांना अगदीं ओक्याबोक्या वाटतील. आजच्या कादंबऱ्यांत कुऱ्हाड किंवा धनुष्य-बाण घेतलेल्या वीरांचे ठसे नाहींत. प्रकरणांची प्रारंभीचीं अक्षरें नक्षीदार नाहींत. प्रकरणाच्या शेवटीं एका पायावर उभे असलेले बगळे



अनुक्रमणिका

नाहींत. म्हणजे दिखाऊपणाकडे आमचा मुळींच कल नाहीं असें म्हणावयाचें कीं काय ! छेः छेः तसें म्हणण्याची कांहीं सोय नाहीं. कारण आमच्या वेष्टनावरील भडक रंगपंचमी पाहिल्यावर कुठल्याहि जुन्या वाचकाला घेरी येईल. साधेपणाचा आरोप तो आमच्यावर चुकूनहि करणार नाहीं. आम्ही मोठे विलक्षण लोक आहोंत असें मात्र त्याला अवश्य वाटेल. आणि आमच्या नवलेखकांनी स्वतःच्या पुस्तकांना लिहिलेल्या कांहीं प्रस्तावना पाहिल्यावर तर आम्हाला काय म्हणावें हेंच त्याना कळणार नाहीं. ‘चुकयांची क्षमा करून नीरक्षीर न्यायानें प्रिय वाचकांनी प्रस्तुत पुस्तकाचा स्वीकार करावा’ यासारखीं नम्रवाक्यें आजच्या प्रस्तावनांतून त्यांना शोधूनहि सांपडणार नाहींत. ‘या कादंबरींत जे दोष असतील ते सर्व माझे अजून गूण मात्र मूळ लेखकाचे आहेत’ अशी उदार व मनमोकळी मान्यताहि त्याला कुठें दिसणार नाहीं. भाषांतरीत वा रूपांतरीत पुस्तकांत मूळ लेखकाचा पत्ता न लागूं देणें यांतच लेखकाची सारी कला कामी आल्याचें त्याच्या अनुभवास येईल. आणि मग तो स्वतःला (व आम्हांलाहि) प्रश्न करील कीं आम्हीं अनेक जुन्या पद्धती कां टाकल्या ? आम्हांला त्या पद्धती हास्यास्पद कां वाटल्या ? केवळ अतिपरिचयामुळेंच कीं काय ? आणि आमचें नवें लिहिणें, नवी वेष्टणें; नवी मुद्रणें यांतील हास्यास्पद आणि भडक भागाची आम्हांला कांहीं कल्पना आहे कीं नाहीं ? कीं एका हास्यास्पद व ढोबळ पद्धतीऐवजीं दुसरी अधिक हास्यास्पद व अधिक ढोबळ पद्धत निर्माण करून ठेवणें हीच आमच्या क्रांतीची व प्रगतीची कल्पना आहे ?

—मी पुस्तकें चाळत होतों व विचार करीत होतों. मी जुन्या पुस्तकांच्या अनुक्रमणिका चाळत होतों, प्रस्तावना वाचत होतों. “प्राक्कथन” व “उपोद्घात” वरून दृष्टी फिरवीत होतों. कर्तरी विशेषणांनीं मढविलेल्या पल्लेदार अर्पणपत्रिकांचे अवलोकन करीत होतों. ‘श्रीमंत राजेबहादूर श्रीपतराव दादासाहेब, चीफ ऑफ मोहरी, यांचेठायीं असलेल्या विद्वत्ता, रसिकता, धार्मिकता, शौर्य, धैर्य, औदार्य, श्रमशीलता, प्रजाहित तत्परता, न्यायप्रियता, करुणा, विनोदबुद्धी, इ. इ. अनेक दैदिप्यमान सद्गुण समुच्चयांवर लुब्ध होऊन प्रस्तुत कृति अत्यंत नम्र भावानें त्यांच्या एकनिष्ठ प्रजाजनानें राजेसाहेबांचे चरणीं सादर, सप्रेम...’ वाचतां वाचतां मी स्मित करीत थांबलों. कमरेभोवतीं शेला व तरवार, डोक्यावर पगडी, कपाळाचीं दोन्ही टोकें सांधणारें आडवें गंध, लफ्फेदार आंगरखा व उग्र मिशा यानीं सजलेलें राजेबहादूरांचें चित्र मीं एकदां न्याहाळून पाहिलें व एकदम पुस्तकाची अखेर गांठली. ‘उपसंहार’ शेवटच्या प्रकरणावर मथळा होता. एखादा गमतीदार स्वभावाचा फार जुना मित्र फारा दिवसांनीं भेटल्यावर वाटावें तसें तो मथळा पाहून मला वाटलें. आजकालच्या पुस्तकांत असे ‘उपसंहार’ सांपडतात कुठें ? माझ्यासमोर पसरलेल्या पुस्तकांत हे ‘उपसंहार’ नानाप्रकारची नावें घेऊन आले होते. “शेवटी” “प्रकरण शेवटचे” “अखेर” एक आणि दोन ! पण ते सारे होते ‘उपसंहारच’ त्यांचा स्वभाव तोच होता. कुणाचें काय झालें हें सांगणारा त्यांचा काटेकोरपणा तोच होता.

“गोविंदराव आणि गोदावरी ह्यांचें मार्गेसरांतल्या पहिल्याच मुहूर्तावर दोघांचे चार हात झाले.”

एका उपसंहारानें अक्षता उधळून ललकारी दिली होती.

“दुष्ट दामोदरपंताचे कारस्थान अशाप्रकारें निष्फळ झाल्यावर माधव आणि रमा ह्यांचे मधुर मीलन झालें. प्रिय वाचक, ‘हिरा बागें’त सनईचे सूर घुमत असतां व सारे वातावरण आनंदमय झालें असतांच आम्ही तुमची रजा घेतों.”

नव्या वर्षाचे नवे बेत : कारकून



चेहऱ्यावर हास्य ठेवणार !

——लग्नवार्तेची वाजंत्री वाजवून वाचकांना नमस्काराचा नारळ देणारा दुसरा एक उपसंहार सांगत होता.

“वाचकहो, ते पहा चंचलराव. चंचलराव आतां पूर्णपणें बदलून गेले आहेत. पौर्णिमेच्या चांदण्यांत न्हाऊन निघालेल्या सुरम्य सौधावर उभ्या असलेल्या तारिणीला पश्चात्तप्त स्वरांत ते म्हणत आहेत, ‘तारिणी, लाडके, कुसंगतीच्या फेऱ्यांत सांपडून म्यां दुष्टानें तुझ्यासारख्या सुशीलेचा फार छळ केला. ह्या पापियाला क्षमा करशील का ? तुला स्पर्श करण्याचीहि माझी योग्यता नाहीं ! पण...’ ह्यावर आनंदाश्रूनीं न्हाऊन निघालेले आपले मुखकमल संकोचानें खालीं करीत तारिणी म्हणाली, ‘इश्श गडे, कुणीतरी पाहील !’

—प्रिय वाचक त्या प्रणयी युगुलाला आनंदसागरांत डुंबावयास तसेच एकांतांत सोडून आपण त्यांचा निरोप घ्यावा हें बरें !”

—प्रणयी युगुलांची मोठ्या सहानुभूतीनें सोय करण्यासाठीं डोकावत राहण्याचा मोह आवरणारा तिसरा उपसंहार वाचकांना सूचना देत होता. “मधुर मीलन” “दोघांचे चार हात” ह्यापुढें कांहीं पावलें टाकून चवथ्या उपसंहारानें त्या “मधुर मीलनाची” पुढील अपरिहार्य परिणती कथन केली होती—

“दिवाकर व सुशीला यांस आतां पुत्ररत्नाची प्राप्ती झाली असून आजीबाई लहानग्या आनंदास (दिवाकर–सुशिलेच्या मुलाचें अर्थपूर्ण नांव) खेळवून आनंदाने कालक्रमण करीत असतात.”

—एका मागून एक दहापांच कादंबऱ्यांचे उपसंहार मी वाचले तेव्हां सारखी मुठीच्या मुठी साखर तोंडांत कोंबल्यासारखें मला वाटूं लागलें. कारण लग्नाचे लाडू अथवा बारशाचे पेढे वाचकांच्या तोंडांत घातल्याविना एकाहि लेखकाचे समाधान झालेले नव्हतें. मग मी आणखी चार सहा कादंबऱ्यांचे शेवट चाळून पाहिले. त्यांत मला अगदीं उलटा सूर लावलेला दिसला. येथे डोहाळे आणि बारसे ह्याविना दुसरी बात नव्हती तर तेथें तिरडी व तेरावें ह्याविना दुसरी गोष्ट नव्हती. येथें

लग्न आणि जन्म ह्यांची एकच धांदल असली तर तेथें मृत्यू आणि मरतीक ह्यांचीच धांदल उडून राहिलेली होती. जणूं आनंदाचे अजीर्ण झालेल्या वाचकांना आतां दुःखाचे जहाल रेचक देण्याचा ह्या लेखकांनीं चंग बांधला होता. मी वाचलेले कांहीं शेवट पुढील-प्रमाणें होते.

"बकवाजखानाच्या हातीं विमलकुमारी अखेरपर्यंत लागली नाहीं. शेंकडों प्रेतांचे खच तुडवीत खान गडावर चढला, तेथें त्याला सातशें सतींच्या चिता धडधडत असलेल्या दिसल्या. विमलकुमारी त्यांतच होती."

आणि दुसऱ्या एका कादंबरीच्या अखेरीस

"सासूच्या जाचाला कंटाळलेल्या जानकीचे प्रेत दुसऱ्या दिवशीं आडांत तरंगतांना सांपडले. रुढीराक्षसी आणखी एका निरागस बालिकेचा बळी घेऊन संतुष्ट झाली."

व तिसऱ्या कादंबरीचा शेवट.

"सुजनसिंहावर दुर्जनसिंहाने प्राणांतिक घाव घातलेला पाहतांच इंद्रकुमारीने अंगठीतलें वीष गिळलें, व डोळे फिरवून ती म्हणाली 'नाथ तुमच्या स्वागतासाठीं ही पहा मी आधींच स्वर्गाच्या दारांत जाऊन उभी राहते.' आणि असें म्हणत असतांच तिचा मृत देह सुजनसिंहाच्या शरीराशेजारीं कोसळला!"

—मरणामागून मरणं आणि सरणामागून सरणं रचणारे हे सारे शेवट पाहून हसूं लोटलें. तेवढ्यांत आमचे नाना काठी फिरवीत आंत आले आणि म्हणाले 'स्वतःशी एवढं हसंत सुटण्यासारखं काय झालं तें सांग पाहूं?"

"त्या कादंबऱ्या पहा."

नानाच्या दिशेनें पांचपंचवीस पुस्तकें सरकवीत मी म्हणालों, "त्या सगळ्या कादंबऱ्या मी पाहिल्या—म्हणजे वाचल्या आहेत."

त्या पुस्तकांवरून नुसती दृष्टी फिरवीत नाना उद्‌गारले. "—परंतु त्या कादंबऱ्यांत एवढं हसण्यासारखं काय आहे? त्या कांहीं विनोदी कादंबऱ्या नाहींत!"

"अहो नाना त्या कादंबऱ्यांतल्या 'उपसंहारां'ना मी हंसतो आहे!"

"कां बरं?" नाना आरशीवरून रोखून माझ्याकडे पहात म्हणाले. "—उपसंहारांतच हसण्यासारखं तुला काय दिसलं?"

"जुन्या कादंबऱ्यांतले हे सारे उपसंहार फार भडक आहेत" मी कुरकुरलों.

"आणखी तुझ्या नवकाव्यांत आणि नवकथेंत भडकपणा काय कमी आहे?"

"वा नाना!" नानांना डिवंचत मी म्हणालों. "आमचं नवलेखन तर जास्त सूक्ष्म झालेलं आहे."

"कसलं रे कर्माचं सूक्ष्म झालं आहे!" नाना युद्धाचा पवित्रा घेत म्हणाले. "तुमच्या नव्या लेखनांत इतकं ओंगळ आणि हलकं लिहिलं गेलं आहे कीं गेल्या तीन पिढ्यांनीं मिळून इतकं घाणेरडं लिहिलं नसेल. जेव्हां पहावं तेव्हां तुमची आपली नितंब उरोजाशी गांठ! जिथें पहाल तिथें मेकूड शेंबूड आणि मैथुन ह्यांची धमाल! अरे ह्याला का सूक्ष्म लिहिणं म्हणतात? हे का साहित्य कां कचरापेटी?"

"नाहीं पण" मी अडखळत प्रारंभ केला. "जरा वास्तवतेच्या दृष्टीनें विचार केला तर...!"

"अस्सं अस्सं!" हेटाळणीच्या स्वरांत नाना मला अडवून म्हणाले.

"स्त्रीचे नितंब आणि उरोज ही तेवढी वास्तवता! पण तिचे हृदय, भावना ही कांहीं वास्तवता नव्हे! तिचा व्यभिचार आणि पतन ही तेवढी वास्तवता! पण तिचे सतित्व आणि सद्‌गूण ही मात्र वास्तवता नव्हे! शेंबूड, लाळ, मैथुन ही वास्तवता! पण फुलें, तारे, विरक्ति आणि त्याग ही कांहीं वास्तवता नव्हे! कुठल्या जगांत जगत असतात रे तुमचे नवे लेखक? वेड्यांच्या कीं रोग्यांच्या?"

"सगळेच नवे लेखक नेहमीं तसं लिहीत नाहीं नाना!"

"दाखवूं तुला?" कपाटांतली कांहीं नवी पुस्तकें आणि मासिकें तावातावानें ओढून काढत नाना म्हणाले, "बोल किती घाण दाखवूं तुला तुझ्या त्या नव्या लेखनांतली?"

ती सगळी घाण अर्थात् मला ठाऊक होती. नव्यांत जें कांहीं चांगलें होतें त्याला नव्यांतले माजलेले वाईट खाऊन टाकत आहे हें मला चांगलें ठाऊक होतें. म्हणून नानानीं ओरबाडून काढलेल्या "नव्या" पुस्तकांकडे मी नुसते पाहिले आणि गप्प बसलों. नाना आणखी स्वर चढवून बोलत राहीले "म्हणे सगळे नवे लेखक नेहमीं तसं लिहीत नाहींत! नसतील लिहीत! मग सगळे जुने लेखक नेहमीं भडक लिहीत होते वाटतं?"

"नाहीं पण नाना" मी म्हणालो "तुम्ही जरा ह्या जुन्या कादंबऱ्यांचे शेवट पहा. कादंबरीच्या शेवटीं कुणाचं तरी लग्न होतं किंवा कुणीतरी मरतं. सगळ्यांचा अगदीं ठरीव ठसा आहे."

"तुमच्या नव्या लेखकांचासुद्धां ठरलेलाच ठसा झाला आहे." नाना ओरडले. "तुमच्या नव्यांचा ठसा लग्न मोडण्याचा असेल तर जुन्यांचा ठसा लग्न लावण्याचा होता. नव्यांचा ठसा व्यभिचाराच्या विजयाचा असेल तर जुन्यांचा ठसा सतित्वाच्या विजयाचा होता. तुम्ही किडलेल्या माणसांची मुरदाड चित्रण करीत असता तर ते चकचकीत माणसाचे मुडदे पाडून मोकळे होत होते."

"तेच तर मी म्हणतो आहे" मी नानांना आणखी खिजविण्यासाठीं म्हणालो "शोकांतिकेच्या आणि सुखांतिकेच्या ह्या जुन्या लेखकांच्या कल्पनाच अगदीं ढोबळ आणि ठरीव होत्या. प्रत्येक कादंबरीच्या शेवटीं ते कुणाला बोहल्यावर तरी ढकलायचे किंवा सरणावर तरी चढवायचे! त्यांची कल्पना अशी कीं कुणाचं लग्न लावलं कीं ती झाली सुखांतिका आणि कुणाला मारून टाकलं कीं ती झाली शोकांतिका!"

"आणखी त्यांची ती कल्पना एका अर्थानें बरोबरसुद्धां होती."

"हा सगळा पोरकटपणा बरोबर होता म्हणतां?"

"तो नुसताच पोरकटपणा नाहीं, त्यांत फार खोल अर्थ आहे!"

"मला तर त्यांत उथळपणाविना कांहीं दिसत नाहीं."

"जगांतली पुष्कळशीं सनातन आणि सूक्ष्म सत्यं तुला दिसत नाहींत त्याला काय करायचं?"

"तुम्हांला जुन्यांत सगळं चांगलं दिसतं!"





"आणि तुला जुन्यांत सगळं वाईटच दिसतं. नव्याजुन्याच्या पलीकडे जाऊन विचार करायची तुम्हां उथळ बुद्धिवाद्यांना संवयच नाहीं !"

—त्यावर मी नानांना कांहींतरी खवचट उत्तर देणार होतों तेवढ्यांत वाटेवर ताशे-वाजंत्र्याचा कडकडाट सुरू झाला आणि लग्नाची एक लांबलचक मिरवणूक आमच्यां डोळ्यांपुढून निघून गेली."

"हा घ्या तुमचा आनंदपर्यवसायी शेवट" मी खदखदून हंसत म्हणालो. "तुमच्या जुन्या लेखकांची आवडती आणि एकमेव सुखांतिका."

"अगदीं बरोबर" नाना गंभीरपणें म्हणाले "आयुष्यांतल्या अगदीं मूलभूत आनंदाचे जन्मरहस्य हेच आहे. 'लग्न !' तरुण स्त्रीपुरुषांचे मीलन ! मनानें व शरीराने त्यांचे एकत्र येणें ! आयुष्यांतील साऱ्या आनंदाचा व सुखाचा हाच मुळीं प्राण आणि पाया आहे. माणसाच्या आयुष्याला आणि अस्तित्वालाच मुळांत कारणीभूत होणारी ही घटना आहे. लग्न ! हा खरोखरच सगळ्या आनंदाचा सम्राट आहे. सगळ्या सुखांचा कळस आणि प्रारंभ आहे !"

नानांचें बोलणें मी प्रथम उपेक्षेनें आणि मग कुतुहलानें ऐकूं लागलों. बोलूं लागले म्हणजे नाना पुष्कळदां चांगले बोलत आणि वेगळे बोलत. पण नाना आतां एकाएकीं बोलण्याचे थांबले आणि खिडकींतून बाहेर पाहूं लागेल. बाहेरून अकस्मात् एक उंच उदास आरोळी ऐकूं आली "राम बोलो भाई राम" आणि आमच्या डोळ्यासमोर एक प्रेतयात्रा हळूहळू निघून गेली. तिरडी-वरचे प्रेत फुलांनीं आणि गुलालानें रंगलेलें होतें. डोळे पुसत त्या प्रेतामागून कांहीं माणसें चाललीं होतीं. तें प्रेत विशींतल्या एका तरुण मुलाचें होतें. आणि तिरडीवर त्याची मान सारखी केविलवाणे हेलकावे घेत होती.

तो देखावा पाहून कसेसेंच झालें. काय बोलावें तें मला सुचेना. नानाहि बोलत नव्हते. ताठ चेहऱ्यानें ते एखाद्या काष्ठ पुतळ्यासारखे खिडकींतून बाहेर पहात होते. "राम बोलो भाई राम"ची आरोळी हळूहळू लांब विरून गेली. नाना अस्वस्थपणें एकदम उठले आणि दाराबाहेर जात म्हणाले, "माझा यशवंतहि

असा विशीचा असतांना गेला." त्यांचा आवाज किंचित् घोगरा झाला होता. तेवढें एक वाक्य बोलून त्यांनीं उसासा सोडला आणि ते दिसेनासे झाले.

* * *

नानांचे आणि माझे मतभेद मी क्षणार्धात विसरून गेलों. नव्याजुन्याचे निरर्थक वादहि विसरून गेलों. अगदीं तरुण वयांत गेलेल्या आपल्या मुलाच्या नांवानें नानांनी सोडलेला श्वास माझ्या मनांत एखाद्या वावटळीसारखा फिरत होता.

—होय मृत्यु हीच एकापरीनें जीवनांतली मोठ्यांतली मोठी शोकांतिका होती. जीवन म्हणजे फुललेलें फूल! मृत्यू म्हणजे त्या फुलांचा पाचोळा! जीवन म्हणजे पेटता दिवा! मृत्यू ही त्याला ग्रासून नष्ट करणारी काळोखी! जीवन म्हणजे चेतना, मृत्यू म्हणजे चेतनाहीनतेची भयप्रद व किडलेली माती! आतांच मी एका तरुण माणसाचें प्रेत पाहिलें होतें. त्याची हेलकावे घेणारी मान पाहिली होती. आणि तो देखावा पाहून माझे अंग शहारले होते. मला कसली तरी किळस वाटली होती, भय वाटले होते. जिवंत देहाचें माणसाला असें भय वाटत नाहीं. पण त्या देहांतून चेतना उणी होतांच ते देह आपणाला भीतिप्रद वाटतात—नकोसे वाटतात. जिवंत माणसाचें प्रेत होतांच ते आपणास नकोसे वाटतें. त्याच देहाचे आपणांस भय वाटूं लागते. त्या देहाविषयीं एक प्रकारची अप्रीतीहि वाटूं लागते. मग ते प्रेत एखाद्या परिचिताचें का असेना! एखाद्या प्रियजनाचे का असेना! सजीव माणसांच्या माना डोलतात व त्या आपण अगदीं सहज पाहतो. प्रेताची हलणारी मान आपणाला पाहवत नाहीं.—प्रेताचा उघडा राहिलेला डोळा, प्रेताचे विलग झालेले ओठ—कांहीं कांहीं आपणाला पाहवत नाहीं!

कारण निर्जीव बनलेल्या मातीची ही भेसूर शोकांतिका आपणांस पाहवत नाहीं. सजीवतेचा हा शेवट आपणांस फार भयप्रद वाटतो. फार दुःखकारक वाटतो.

* जगांत दुःखे अनेक आहेत. कांहीं दुःखे शरीराची आहेत, कांहीं मनाची आहेत. जगांत अनुभव अनेक आहेत. कांहीं सुखकारक आहेत, व कांहीं दुःखकारक आहेत. परंतु मृत्यु हेच एकापरीने मोठ्यांतले मोठे दुःख आहे. मृत्यूचा अनुभव हाच सीमेचा हृदयभेदक अनुभव आहे. कारण मृत्यूचा अनुभव ही साऱ्या अनुभवांची अखेर आहे.



## शिंप

एका एका शब्दांतून
अर्थ दोन शोधूं नको.
माझी चाकोरीची रेषा
मार्ग व्यर्थ रोधूं नको

एका एका कृतीमध्यें
तर्क दोन काढूं नको
एक तुटलेला स्वर
तार व्यर्थ जोडूं नको

एका एका धाग्यामध्यें
पीळ दोन पाहूं नको
पिळा पिळामध्यें मला
गुंतवीत राहूं नको

एक शिंपली छेदून
खुळ्या, मोती वेचूं नको
शिंपलीचा वेध घ्याया
मोती व्यर्थ ठेंचूं नको

—*निर्मला देशपांडे*

जीवनांतील बऱ्यावाईट अनुभवांना बरेवाईट रंग असतात. पण तरीहि ते सारे रंग असतात मात्र जीवनाचेच! आणि सतत विणल्या जाणाऱ्या जीवनाच्या त्या सजीव गोफांत दुःखाचे कांही गडद रंगहि खुलून दिसतात! कारण गाढ दुःखाचे असले तरीहि ते रंग असतात जीवनाचेच! त्या मंद, उग्र, गडद व फिकट रंगानींच आयुष्याचे इंद्रधनुष्य रंगविलेलें असतें! आणि साकल्यानें पाहिलें तर काळ्या शून्याकारावर उभें झालेलें तें इंद्रधनुष्य सुंदरच वाटतें, स्पृहणीयहि वाटतें! कारण सजीवता ही मुळांतच एक सुंदर व स्पृहणीय वस्तू आहे. सजीवतेची केवळ सुखेच नव्हत तर दुःखेंहि स्पृहणीय आहेत. कारण सुखांप्रमाणेंच दुःखांचेंहि रससेवन करूं शकते केवळ सजीवताच! आणि ह्या आयुष्यांतील सुखांप्रमाणेंच ह्या आयुष्यांतील दुःखेंहि रसपूर्ण आहेत! एखाद्या मधुर व मादक पेयाचे घोट अंगावर सुखाचा शहारा आणतात. आणि काडेचिराइताचे काळे पाणीहि आपल्या कडूपणानें अंगावर कांटा आणतें. पण हा शहारा व हा कांटा येऊं शकतो केवळ जिवंत शरीरावर! शरीर मेलें म्हणजे रोमांचहि मेले व कांटाहि गेला. हळदीनें पिवळ्या पडलेल्या नवरानवरीच्या पहिल्या मीलनांत सुखाची परमावधी आहे! आनंदरसाचा अर्क आहे. पण सुखाशेने सजलेल्या बोहल्यावरच विरक्तीचे बाण घेऊन वैराग्याची अफाट वाट चालू लागणाऱ्या साधु पुरुषाच्या त्यागांतहि मोठा धुंद रस आहे! एक रस भोगाचा आहे व दुसरा त्यागाचा आहे. पण हे दोन्ही रस निर्माण करतात व भोगूं शकतात केवल जिवंत माणसें! त्या माणसांचीं प्रेतें नव्हत. आणि मृत्यु हा तर केवळ प्रेतरूप आहे. मृत्यु म्हणजे साऱ्या रसांचा शेवट. साऱ्या अनुभवांचा शेवट. मृत्यु म्हणजे माणसाला मिळालेला मोठ्यांतला मोठ्या वरदानाचा शेवट, मृत्यु म्हणजे प्रत्यक्ष जीवनाचा शेवट! तेंव्हां मृत्यूपेक्षां जीवनाची अधिक मोठी शोकांतिका कोणती असूं शकेल? जीवनांत शोककारक प्रसंग पुष्कळ असतात पण अखेर ते सारे हृदयविदारक प्रसंगहि जीवनांतलेच असतात. जीवनाचे चेतनामय नाटक त्या प्रसंगाप्रसंगांतूनहि सजीवपणें स्पंदन करीतच असते. पण मृत्यू म्हणजे मात्र त्या नवरसपूर्ण नाट्यावर पडणारा पडदा! त्या नाट्याचा शेवट! जीवनांतल्या कुठल्याहि भयानक प्रसंगापेक्षां हा जीवनाचा शेवट अधिक शोककारक आहे, भयानक आहे.

एखाद्या सजीव चालत्याबोलत्या माणसाचें काष्ठवत् प्रेत होणें, त्यानें सजीव माणसांच्या जगांतून नेहमींकरितां नाहींसें होणें, त्याच्या उष्ण व मृदु शरिरानें मातीच्या व राखेच्या

अनुक्रमणिका

जगांत समाविष्ट होणें ही खरोखरच केवढी हृदयविदारक घटना आहे !

जन्मभर ज्या माणसांना आपण पाहिलें त्या माणसांना मृत्यूचा स्पर्श होतांच ती नाहींशी होतात. तीं इतकीं आणि अशाप्रकारें नाहींशी होतात कीं तीं कधीं अस्तित्वांत होतीं हेंच मुळीं खरें वाटूं नये. सारी पृथ्वी पालथी घातली तरी पुन्हां त्यांचा कधीं शोध म्हणून लागूं नये. त्यांचे कधीं चुटपुटते दर्शनहि होऊं नये. मृत्यूचे पाश पडतांच जीवन गुदमरून जाते. जी जिव्हा जन्मभर अगणित शब्द बोलली असेल ती शब्दालाहि महाग होते. ज्या डोळ्यानीं अनेक ऋतूंचे अनेक रंग पाहिले, अनेक चेहरे व प्रसंग पाहिले ते भिजून कवड्यांसारखे होतात. त्यांचे तेज मालवते, व मागे उरतात केवळ मांसाचे दोन निर्जीव गोळे. जीवनज्योत मालवलेले ते मांसाचे गोळे पुन्हा कधींहि कांहीं पहात नाहींत. मृत्यूचे विराट व विनाशकारी दर्शन होतांच डोळ्यांचे भिंग तडकते व फुटून जाते. मृत्यूचे थिजलेले दर्शन घडविणाऱ्या त्या डोळ्यांकडे मग पाहवतहि नाहीं. आणि तीच अवस्था माणसांच्या मृत देहाचीहि होते. थंडीच्या स्पर्शानें हा देह थरारलेला असतो. पावसाच्या आकाशाखालीं हा देह भिजलेला असतो. उबदार बिछान्याच्या मऊपणांत हा देह सुस्तावलेला असतो. तरुण स्त्रीच्या पहिल्या स्पर्शाने हा देह धुंद झालेला असतो. उत्तमोत्तम अन्नाची रुचि त्या देहाने घेतलेली असते. व त्या बाईट अनुभवांच्या अनेक आवर्तांतून हा देह फिरलेला असतो. आणि मग अकस्मात् एके दिवशीं ह्या देहाला मृत्यूचा स्पर्श होतो, व त्याची यात्रा थांबते. त्याचे भ्रमण थांबते. त्याची संवेदना संपुष्टांत येते. पावसाळी दिवस येतात व जातात. हिंवाळ्यांत दवानें गवताची पाती ओली होतात. पौर्णिमेच्या चांदण्यांत सारी चराचर सृष्टी न्हाऊन निघते. पण ते चांदणे त्याला कधीं सुखविणार नसते. दवबिंदूनी त्याची पावले कधीं ओली होणार नसतात. पावसाच्या पहिल्या सरीनें त्याचें शरीर कधी सुखावणार नसतें व विजेच्या कडकडाटानें हा कधीं स्तिमित होणार नसतो. त्याच्या तोंडांत गरम, सुग्रास अन्न पुन्हां कधीं जाणार नसतें. ह्या देहाला मृत्यूचा स्पर्श होतांच ते सारें मुळीं संपूनच जातें. जगाच्या दृष्टीने हा संपतो व त्याच्या लेखीं जग संपतें. सारें सुखदुःख संपते, सारें बरें वाईट संपतें. जीवन व आयुष्यच मुळीं संपून जातें. आणि मग त्या देहाचे केवळ प्रेत बनते. एक मेलेले, केविलवाणे, किळसवाणे प्रेत ! आणि काळाने ह्या देहांतील जीवनरसाचा घोट घेतांच देहाचा हा चोथा सडूं लागतो. जे आतांच जिवंत होतें तें किडूं लागतें. व स्नेहाने जपलेला हा देह त्याचे आप्त व प्रियजनहि त्वरेनें नष्ट करून टाकतात. जो आतांच जिवंत होता त्या देहाचें सडणें ! जो आतांच जिवंत होता त्या देहाचें मरणें ! त्याच्या भावना, कल्पना संवेदना त्याच्या सजीवतेचे साऱ्याचें मरणें ! खरोखर हीच मोठ्यांतली मोठी

## पारितोषिकांची योजना.

उच्चभ्रू टीकाकारांच्या मतापेक्षां सर्वसामान्य वाचकांचेंच मत मोलाचें. त्यामुळें मराठींतील वाचकांची अभिरुचि जाणून घेण्याच्या दृष्टीनें ' दीपावलीनें ' ही पारितोषिकांची योजना आंखली आहे. या योजनेंत सर्व वाचक सहभागी होऊन सहकार्य देतील ही आशा.

- पुढें एक विनामूल्य कूपन दिलें आहे. तें १० मार्च १९६० पर्यंत भरून पाठविणाऱ्या वाचकांच्या निवडीची नोंद घेण्यांत येईल.
- **दीपावली** मार्च ५९ ते फेब्रुवारी ६० पर्यंतचे (खास अंक धरून) सर्व अंक वाचून त्यांतील सर्वोत्कृष्ट साहित्याची नोंद करायची.
- वाचकांनी आपल्याला आवडलेली उत्कृष्ट गोष्ट क्रमांक १, सर्वोत्कृष्ट ललित, विनोदि अगर विचार प्रवर्तक लेख—क्रमांक २, सर्वोत्कृष्ट कविता—क्रमांक ३, सर्वोत्कृष्ट इतर साहित्य ( यांत प्रवासवर्णन, शरीरस्थ कथा रम्यः, दीपमाला, मूर्ति लहान कीर्ति थोर, तिथें वदलला सांधा, क्रिकेट विषयक, माननीय व्यक्ति अगर अन्य कांहींहि )—क्रमांक ४ याप्रमाणें निवडून कूपनामध्यें त्याची नोंद करून पाठवावी.
- येणाऱ्या एकंदर कुपनांतील क्रमांकाच्या बहुसंख्येनें ज्या ज्या लेखकांचा क्रमांक लागेल त्या त्या लेखकांना पुस्तक रूपानें विशेष मानधन देण्यांत येईल.
- या अंतिम निवडीची अचुक नोंद असलेल्या प्रेषकानां दीपावलीचे एक वर्ष ( विनामूल्य ) वर्गणीदार करण्यांत येईल. बक्षिसपात्र वाचक अगोदरच वर्गणीदार असल्यास त्यास पुस्तक रूपानें पारितोषिक देण्यांत येईल अगर त्याच्या नांवे इतर कोणा मित्रासहि अंक वर्षभर पाठविण्यांत येईल.
- कोणत्याहि कारणानें एकादें कूपन रद्द करण्याचा अधिकार संपादकांस राहील. रद्द कूपनाबद्दल पत्रव्यवहार केला जाणार नाहीं.
- संपादकांचा निर्णय अखेरचा.
- एप्रिल ६० च्या अंकांत निर्णय जाहीर करण्यांत येईल.

**कूपन**

१ ____________________

२ ____________________

३ ____________________

४ ____________________

नांव ____________________

संपूर्ण पत्ता : ____________________

____________________

____________________

योजनेच्या सर्व अटी मला मान्य आहेत.

सही ____________________

शोकांतिका होती ! जीवनाची खरी व भीषण शोकांतिका मृत्यू हीच होती. जीवनांतील आपदा व यातना नव्हत. कारण अखेर त्या आपदा व यातनाहि सजीवतेच्या रंगमंच खेळाचाच भाग होता ! जीवनाची मोठ्यांतली मोठी व एकमेव शोकांतिका म्हणजे त्या जीवनाचा नाश—मृत्यू !

माणसाचे प्रेत होणें ! त्या प्रेताचे डोळे थिजणें ! काया मरणें त्याची गति कुंठित होणें ! मेंदूचे केवळ सडूं घातलेलें मांस होणें त्या माणसानें निर्जिव होणें ! विद्रूप होणें ! अवांछनीय व भयप्रद बनणें !

असे एका तरुण माणसाचे भयप्रद व केविलवाणे प्रेत मी आतांच तिरडीवरून जातांना पाहिलें होतें. त्या प्रेतामागून माणसें रडत जात होती. पण ती माणसें अद्याप जिवंत होतीं त्यांचे दुःख हें जिवंत माणसाचें दुःख होतें. नानांचा मोटा मुलगाहि असाच तिरडी वरून गेला होता. नानाहि त्याच्यासाठीं दुःख करीत होते. पण अद्याप ते जगत होते. पुस्तके वाचीत होते. वादविवाद करीत होते. उन्ह आणि पाऊस अंगावर घेत होते. आयुष्य त्यांना एका परीने स्पृहणीय वाटत होते म्हणूनच ते जगत होते. प्रेताला पोहोंचविणारी माणसें स्मशानांतून परत घरीं येतात. हे जीवन त्यांना स्पृहणीय व आकर्षकच वाटत असते. त्यांना स्पृहणीय व आकर्षक वाटत नाहीं मृत्यू. मृत्यूच्या अथांग व अज्ञात अंधकाराचे त्यांना भय वाटतें. त्या उबदार जीवनाला बिलगून रहावें असेंच त्यांना वाटत असते. मृत्यू ही त्यांना जीवन-वृक्षाला लागलेली कीड वाटते. मरण हा त्यांना शाप वाटतो व जीवन हें सर्वश्रेष्ठ वरदान वाटतें. कारण जीवन हें माणसाचें सर्वस्व व मृत्यू हा त्या सर्वस्वाचा सर्वनाश ! जीवन हें साकल्यानें उपभोग्य व आनंददायक व मृत्यू ही त्या उपभोगमय आनंदाची मूठभर राख ! त्या जीवनांची भेसूर शोकांतिका ! जीवनांतल्या साऱ्या दुःखांचा परमोच्च बिंदू ! ज्या आपत्तीवर कुठलेंहि औषध नाहीं ज्याचा कसलाहि प्रतिकार व परिहार करतां येत नाहीं, जी आपदा अगदीं अनिच्छेनें व हतबलपणें सहनच करावी लागते, अशी ही मृत्यूची आपदा आहे. पिंजऱ्यांत गांगरून धडपडणाऱ्या उंदराप्रमाणें मृत्यूपाशांत धडपडणाऱ्या माणसाचा निरुपाय हृदयभेदक असतो, व माणसाचे प्राण चोखून घेऊन मृत्यूने मातीवर फेकलेले त्याच्या देहाचे फोलपट हे जीवनाच्या शोकांतिकेचें भेसूर भरतवाक्य असते. खरोखर मरण हीच जीवनाची शोकांतिका ! जीवनाची नदी तेथेंच काळाच्या अज्ञात प्रदेशांत आटून जाते ! फुललेलें उद्यान वैराण होतें ते तेथे. पाने ओरबाडणारे वादळ, जाळपोळ करणारा ग्रीष्म, गारठून टाकणारा शिशिर हा कांहीं उद्यानाचा अंतीम शत्रू नव्हे. जीवनाचे उद्यान सर्वस्वी उध्वस्त करून टाकणारी एकमेव शोककारक घटना म्हणजे......

—एकाएकी खिडक्यांची दारें आपटलीं. दारावरचा पडदा फडफडला. पुस्तकांची पानें उडूं लागलीं. मी दचकलो व सावध झालों.

दोन मिनिटापुरतीच एक वावटळ येऊन गेली होती. त्या वावटळीनें मेजावरची कांहीं पुस्तके खालीं उडवून दिली. उपसंहार–बसल्या बसल्या त्या पुस्तकांतील शेवटच्या प्रकरणाचा मथळा मला दिसत होता. आणि आतां त्या मथळ्याचे मला हंसू येत नव्हते. ती बिचारी जुनी विस्मृत पुस्तके होती. एका परीनें ती पुस्तके मेलेलीच होती.

त्यांचा जन्मक्षण हाच खरोखर आनंदाचा होता. कारण तो त्या जीवनग्रंथांचा आशादायक प्रारंभ होता. अनेक रसांनी रंगलेला तो समग्र ग्रंथ अद्याप पुढेंच होता. अद्याप त्या ग्रंथाच्या समाप्तीची अक्षरें दूर होती. लेखकाच्या समाप्तीची अक्षरें दूर होती. आणि हा समाप्तीचा मृत्युलेखच फार भयंकर होता. पुस्तकाच्या समाप्तीचा मृत्युलेख लेखकाच्या समाप्तीचा मृत्युलेख ! त्या समाप्तीच्या अक्षरांइतकें वाईट ह्या जगांत कांहीहि नव्हते.

आणि हे महान् सत्य जुन्या लेखकांना कळलेलें होतें. आणि म्हणूनच त्यांच्या कथानकांचे शेवट अटळपणें मृत्यूशीं निगडीत झालेले होते आणि त्यांची आनंददायक पर्यवसानाची कल्पना लग्नाशीं किंवा आपल्या जन्माशीं एकरूप बनली होती. कारण लग्न म्हणजे जन्म ! तरुण स्त्रीपुरुषांचे मीलन म्हणजेच मनुष्यजातीचे सातत्य, म्हणजेच माणसाला अस्तित्वाचे, आयुष्याचे व उपभोगांचे अमूल्य वरदान देणारी परम आनंददायक घटना ! ज्या घटनेमुळें माणसाला प्रत्यक्ष अस्तित्वाचा लाभ होतो, ज्या घटनेमुळें ह्या जीवनाच्या बहुरंगी रंगमंचावर त्याचा प्रवेश होतो, त्या घटनेपेक्षां अधिक आनंददायक व रोमांचकारक घटना दुसरी कोणती असूं शकेल ? मृत्यु ही जर माणसांच्या सर्वस्वाची मूठभर राख असेल, तर लग्न हे त्याच्या सर्वस्वाचे बीजारोपण होते. मृत्यू हा जर सर्वस्वाचा अंत असेल, तर लग्न हा त्याच सर्वस्वाचा आरंभ होतो. मृत्यू हा जर जीवनाच्या नाटकावर पडणारा शेवटचा पडदा असेल, तर लग्न हा त्या रसपूर्ण नाटकाचा प्रारंभ दाखविणारा पहिला उमलता पडदा होता ! मृत्यू ही जर आयुष्याची भीषण भैरवी असेल तर लग्न हे आयुष्याचे मंगलाचरण होते. माणसांना आनंदाने फुलवून सोडणारी सुखकारिका होती.

मृत्यू दाढावर दाढा रगडत असतांहि बोहोल्यावर एकरूप झालेले स्त्रीपुरुष त्या मृत्यूच्या मुखांतूनच स्वर्गाचे सुख छिनावीत होते. मृत्यू माणसाला मारीतच होता, आणि माणसाला संगोपन देतच होते, चिरजीवन येतच होते. पुन्हां पुन्हां प्रहार करणाऱ्या कृतांतावर पुन्हां पुन्हां मात करीतच होते ! मरणारी माणसेंहि मरण्यांपूर्वी जीवनाच्या बोहोल्यावर जीवनाच्या अमरवेलीची पेरणी करीतच होती ! मृत्यू मारतच होता, आणि तरीहि जीवन मरत नव्हते. स्त्रीपुरुषांच्या प्रीतिसंगांतून जीवनाचा ओघ अखंडपणें व अप्रतिहितपणें वहातच होता. आणि म्हणूनच स्त्री-पुरुषांचा संयोग घडवून आणणारी लग्न ही घटना मानवी जीवनांतील आनंदाचा परमोत्कर्ष दाखविणारी होती. आशामय सुख संवेदनेचे ते पताकास्थान होते. निर्मितीला मिळालेला तो अमरपट्टा होता !

मीलनानंदाच्या त्या सुखाची सर दुसऱ्या कुठल्याहि सुखाला नव्हती !

ललित लेखनाच्या जुन्या संकेताना गवसलेले रूढीग्रस्त नव्या लेखनाला न आकललेले असे हे मरण मीलनाविषयीचे परम सत्य होते !

वाऱ्याची आणखी एक झुळूक आली आणि "उपसंहाराची" ती पाने पुन्हां एकदां माझ्यासमोर फडफडली. हळूवारपणें मी ती पुस्तके मिटली. आणि त्या पुस्तकांकडे पहात राहिलो. त्या जुन्या कादंबऱ्यांचे शेवट आतां मला अगदीं हास्यास्पद वाटेनात !

● ● ●

अनुक्रमणिका










# चूक आणि दुरुस्ती

वाणीजसारख्या गांवांत आपल्याला कधीं जावें लागेल यावर मोहनलालनें एक वेळ विश्वास ठेवला असता. परंतु तिथल्या मेडिकल स्टोअर्समध्यें सुलोचना मेहता दिसेल आणि ती आपल्याला ओळख देईल यावर त्यानें कधींच विश्वास ठेवला नसता !

जोनाथन डिसूझाला मुंबईहून तार आली तेव्हां त्याला प्रथम आठवण झाली ती मोहनलालची. त्यानें मोहनलालला म्हटलें "मिस्टर दवे, या खेपेला वाणीजची ट्रीप मला रद्द करावी लागेल. तूं जर तयार झालास तर तिथली ऑर्डर मला पुरी करतां येईल. माझ्यावर फार उपकार होतील तुझे."

मोहनलालनें वाणीजला जायचें कबूल केलें.

तिथल्या मेडिकल स्टोअर्समध्यें तो बोलत बसला असतांना तिथें सुलोचना आली. त्याला अतिशय आश्चर्य वाटलें.

"माफ करा. तुम्हीं सुलोचना मेहता का ?" त्यानं विचारलं.

"अर्थात्च.—नि तुम्हीं मोहनलाल दवे. बरोबर ?"

"तूं इथं कशी ?"

"नि तुम्हीं कसे इथं ?"

मोहनलाल हंसला. म्हणाला, "आमच्या कंपनीचा दुसरा एक विक्रेता आज येऊं शकला नाहीं म्हणून त्याच्याऐवजीं मी आलोंय्. रात्रींच्या गाडीनं परत जाणार."

"मी इथंच असते" सुलोचना म्हणाली. "माझे मिस्टर इथं वाणीजला नोकरीला असतात."

सुलोचनेनें इतक्या थंडपणें उत्तर दिलें तेव्हां मोहनलाल मनाशीं म्हणाला, "ह्या मुलीच्या मनोवृत्तीचं कौतुक करावं तितकं थोडंच आहे. मृणाल ठक्करचं नांव आपल्या बरोबर गोंवलं जाऊं लागलं तेव्हांसुद्धां..."

...एकमेकांशीं वचनबद्ध झाल्यानंतर-सुद्धां मोहनलाल जेव्हां मृणाल ठक्करशीं संबंध वाढवूं लागला तेव्हां सुलोचनेनें त्याला एकदां त्याबद्दल विचारलें होतें.

"मला ती आवडते इतकंच. तूं भलता संशय घेण्यांत मला कांहीं अर्थ दिसत नाहीं." मोहनलालनें कपाळावर आठी ठेवून म्हटलें होतें.

"भलता अर्थ मनांत येण्याइतके तुमचे संबंध वाढलेले आहेत हें मला ठाऊक आहे. माझ्यापेक्षां ती अधिक नटते, आपल्या कॉलेजांत प्रत्येक ठिकाणीं पुढाकार घेते, मुलांशीं अति मोकळेपणानं बडबडते तेव्हां तुला तिचं आकर्षण वाटणं जितकं स्वाभाविक आहे तितकंच मला राग येणं स्वाभाविक आहे."

"हा खोटा आरोप आहे. तसं म्हटलं तर ती त्या स्कॉलरशीं–अरविंद शहाशीं सुद्धां तितक्याच मोकळेपणानं—"

"मला फक्त तुझ्याशीं कर्तव्य आहे. तुझं असं वागणं मला आवडत नाहीं."

"तुझं असं बोलणंहि मला आवडत नाहीं. आजपासून आपले संबंध सुटले." मोहनलालनें तिला रागानें म्हटलें. नाहींतरी मृणाल ठक्करनें मोहनलालजवळ आपलें प्रेम व्यक्त केल्यानंतर कांहींहि करून त्याला सुलोचनेचे संबंध तोडायचेच होते.

मोहनलालनें असें म्हटल्यानंतर सुलोचनेनें थंड मनानें तें विष पचविलें होतें. पुन्हां कधीं मोहनलालबद्दल तिच्या तोंडून कुणी शब्द ऐकला नव्हता. त्यानंतर तिनें कॉलेज सोडलें होतें. मोहनलालनें मृणाल ठक्करशी लग्न केल्याचें तरी तिला ठाऊक होतें कीं नाहीं, कोण जाणे !

...आणि आज कितीतरी वर्षांनीं वाणीजच्या मेडिकल स्टोअर्समध्यें सुलोचना मोहनलालला भेटत होती, ओळख दाखवीत होती, म्हणत होती, "मी इथंच असते. माझे मिस्टर इथं वाणीजला नोकरीला असतात."

मोहनलालला मागचे सारे प्रसंग आठवले, नि वाटलें, पुन्हां हिच्याशीं मनांतल्या चार गोष्टी बोलाव्यात. मृणाल ठक्करशीं लग्न करूनहि आपण दुःखीच कसें राहिलों, तिला अजूनहि अरविंद शहाचीच कशी आठवण होते, आपल्या गत गोष्टींचा किती पश्चात्ताप होतो हें सारें सांगावें. पण त्याला हवे ते शब्द मिळत नव्हते. वाटत होतें, हें सगळें सांगण्यांत कांहींच अर्थ नाहीं; त्यापेक्षां... त्यापेक्षां त्या पापाचें क्षालन करण्यासाठीं हिला सांगावें...

—पण सुलोचनेनेंच विचारलें, "मृणाल कशी आहे ?"

मोहनलाल हंसला आणि म्हणाला, "अग, मृणाल शेवटीं आपल्या वळणावर गेली. तिच्या नाचऱ्या स्वभावाला मीहि नापसंत ठरलों. तिचं दुसऱ्याशींच लग्न झालं."

"असं ? कुणाशीं ?"

"तुला तो स्कॉलर—अरविंद शहा आठवतो ? त्याच्याशीं लग्न झालं तिचं. मी अविवाहितच आहे अजून...आणि तेवढी शिक्षा हवीच होती मला. नाहीं ?"

सुलोचना कांहींच उत्तरली नाहीं. फक्त हंसली. म्हणाली, "तूं केव्हां जाणार आहेस परत ?"

"आज रात्रीं."

"मग संध्याकाळीं आमच्याकडे जेवायला ये. तुला मी आमचा पत्ता देते."

सुलोचनेनें स्टोअर्सच्या मालकाकडून कागद मागून घेतला. त्यावर आपला पत्ता लिहिला.

"अच्छा. मी जाते. तूं येईं जेवायला न विसरतां."

सुलोचना निघून जाईपर्यंत मोहनलाल तिच्याकडे पहात होता. तिला थाप मारून आपण कांहीं अंशीं तरी पापक्षालन करून घेतलें या आनंदांत त्यानें हातांतला पत्ता वाचला.

—सुलोचनेनें पत्ता लिहून त्या खालीं लिहिलें होतें—'मानेंच अरविंद शहाशीं लग्न झालें आहे !!'

• •

नरोत्तम भट्ट



अनुक्रमणिका






# भारतीय भाषेचा इंग्रजी अवतार

## भाषिक दत्तविधान

— श्री. वा. जोशी एम्. ए.

कालानुक्रमानें मागोवा घेतला म्हणजे त्या त्या काळांतील शब्दनिर्यातीवर स्थूलमानानें तत्कालिन परिस्थितीचा ठसा आढळतो. सतराव्या शतकांतील शब्द तपासले तर असें आढळतें कीं इंग्लंड आणि भारत यांच्यातील सुरुवातीचे संबंध सलोख्याचे होते. पोर्तुगीजांचें बस्तान पक्कें झालें होतें, मोंगल राजवट भरभराटीस चढली होती आणि इंग्रजांनीं व्यापाराच्या निमित्तानें चंचुप्रवेश करून हालचाली सुरू केल्या होत्या. या शतकांत इंग्रजींत गेलेले भारतीय शब्द व्यापारधंदा दाखविणारे आहेत, भारतांतून निर्यात होणाऱ्या वस्तूंचे निदर्शक आहेत. यांनाच इंग्रजींत Contact Words म्हणतात. Calico, Chintz, Tussore, Bengal, Palampore, Dungaree, Amdaiat यासारख्या कापडाच्या जाती त्यांच्या मूळ बाजारपेठांच्या नांवानें ओळखल्या जाऊं लागल्या. प्रथम प्रथम सर्व युरोपांत सगळ्या तऱ्हांच्या हिंदी कापडांना फक्त Calico च म्हणत. या 'कॅलिको' शब्दाची मुलुखगिरी मनोरंजक वाटावी. कालिकत या केरळकिनाऱ्यावरील बंदरांतून निर्यात होणाऱ्या कापडाला प्रथम हें नांव पडलें. पुढें इंग्लंडांत हें कापड लोकप्रिय झालें, त्यांचे कपडे घालणें ही फॅशन झाली. Calico ball म्हणून एक खास नाचाचा कार्यक्रमसुद्धां वरच्या वर्गांत प्रिय झाला. या कार्यक्रमाचे वेळीं सर्व निमंत्रित स्त्री-पुरुषांना या 'कालिकत' कापडाच्याच पोषाखाचें बंधन असे. पण पुढें अधिक चांगले, तलम कापड भारतांतून जाऊं लागल्यावर या शब्दाचें नशीब फिरलें. 'Calico Ball' चा अर्थही 'खालच्या दर्जाचा, दरिद्री नाच' असा उलटला. अमेरिकेंतसुद्धां 'छापील सुती कापड' या अर्थानें 'Calico' शब्द रूढ झाला आणि अमेरिकेंतील लोक भाषेंत (Slang) "Oh! She's a Calico!" असें सुंदर मुलीबद्दल म्हटलें जाऊं लागलें! फ्रान्समध्यें त्याला निराळेंच वळण मिळालें. 'Calicot' या फ्रेंच शब्दाचा अर्थ 'शिंप्याचा मदतनीस' असा आहे! 'सुरत' हा शब्दहि प्रथम चांगल्या कापडासाठींच वापरण्यांत आला. नंतर त्याचें पण पारडें फिरलें. 'कमकुवत, भेसळ असलेलें कापड' असा अर्थ त्याला आला. एवढेंच नव्हे तर 'भेसळ असलेले एवढ्याच अर्थानें 'Surat' हा शब्द वापरला जात होता. एका उंची मद्याच्या कारखानदारानें त्याच्या दारूस 'Surat brew' (सुरती काढा) म्हटल्याबद्दल एका इसमावर अब्रुनुकसानीची फिर्याद केल्याचा उल्लेख सांपडतो! Bania, borah, shroff, coolie, Bazaar, rupee, pice, mohur, seer, tola, maund वगैरे या शतकांतील शब्द स्पष्टपणें व्यापारी संबंध दर्शवितात. Topass हा इंग्रजी शब्दसुद्धां असाच मनोरंजक आहे. त्याचा आजचा अर्थ, जहाजावरील सांगकाम्या, भंगी असा आहे. त्याचें मूळ पोर्तुगीज अंमलांत निघतें. पोर्तुगीज सैनिकांच्या एतद्देशीय संबंधांमुळें एक नवीन जात निर्माण झाली होती. या लोकांना देशी आणि पोर्तुगीज या भाषा कामापुरत्या बोलता येत. त्यामुळें जहाजावरती हलकी कामें करून वेळप्रसंगीं ते 'दुभाष' म्हणूनहि उपयोगी पडत. हे 'दुभाष' नांव त्यांना कायमचें चिकटले. मूळ अर्थ मात्र पार लोपला. दुसरा 'फिरंगी' हा शब्द. तो 'Frank' वरून आला हें उघड आहे. भारतीयांनीं त्या काळांत तो सर्रास गोऱ्या लोकांसाठीं वापरला. डिंगमार, वलंदेज, फराशी, टोपीवाले, वगैरे शब्दांनीं भिन्न भिन्न युरोपीयनांचा निर्देश झाला तरी 'फिरंगी' हा शब्द सैलपणें सर्वांसाठीं वापरण्यांत आला आणि खुद्द इंग्रजांनींहि तो त्याअर्थी वापरलेला आढळतो. पुढें त्यांतील तिरस्कार त्यांना जाणवला असावा. इंग्रजींतून त्याची हकालपट्टी झाली. दक्षिण भारतीय भाषांत 'फिरंग' हा शब्द तोफ या अर्थानें रूढ आहे. कारण सांगावयास हवें? याच शतकांत पोर्तुगीजांकडून इंग्रजांनीं मल्याळी भाषेंतील शब्द उचलले. ते आजहि रूढ आहेत. उदा. Betal, areca, coir, copra आणि jack. मोंगल साम्राज्याशीं संबंध दाखविणारे शब्द म्हणजे फर्मान, दरबार, मुनशी, गुमास्ता, फकीर, खिदमद-



अनुक्रमणिका






…दार, चौकी, कचेरी, महाल, डोली वगैरे. कोणाहि वैभवशाली व्यक्तीला The great mogul म्हटलें जाऊं लागले. आजहि इंग्रजींत 'mogul' हा शब्द त्याच अर्थानें वापरतात. उदा. चित्रपटधंद्यांतील श्रेष्ठ निर्मात्यांना Movie moguls म्हणतात. 'Hobson-jobson' व Jaggeraut हे शब्दप्रयोग याच काळांतले. hobson-jobson हा शब्द Yale आणि Burnell या विद्वानांनीं इंग्रजी भाषेंतील भारतीय शब्दांचा जो खास कोश तयार केला त्यासाठीं अन्वर्थक ग्रंथनाम म्हणून निवडला. या कोशामुळें हिंदी शब्दमिश्रित इंग्रजीला आजहि Hobson Jobson म्हणतात. मोहरमच्या दिवशीं मुसलमान लोक डोले मिरवितात व त्यापुढें 'हाय हुसेन! या हसन!!' असा आक्रोश करतात. याच क्रंदन शब्दांचें इंग्रजींत Hobson Jobson झालें. (आपल्या 'हैदोस धुला' शब्दाचें मूळ इथें वाचकांना आठवत असेल. 'हाय दोस्त! दुलाहा वेधूला!' हाहि मोहरममधील आक्रोश आहे. नुकताच नवरदेव (दुलाहा) झालेला हुसेन मारला गेला. त्याचेंच दुःख मोहरमच्या दिवशीं पाळतात. या सामुदायिक शोक प्रगटनांत कित्येकांच्या भावना अनावर होतात. त्यामुळें मराठींत आज त्या शब्दाला अनावर, असंयत गडबड असा अर्थ आला आहे.) Jaggernaut हा शब्द 'जगन्नाथ' चा अपभ्रंश. पुरी येथील जगन्नाथाच्या रथयात्रेपुढें मुक्ति मिळविण्याच्या हेतुनें अनेक भाविक हिंदु आत्मसमर्पण करीत असें म्हणतात. इंग्रज प्रवाशांत असल्या रिवाजांबद्दल कुतूहल फार. त्यामुळें या घटनेची वर्णनें केली गेली. आणि रणगाडा, वरवंटा, समूळ चिरडणारी शक्ति अशा अर्थानें तो शब्द रूढ झाला. उदा०–Jaggernaut of dictatorship म्हणजे 'हुकुमशाहीचा वरंवटा.'

पुढें अठराव्या शतकांत हा शब्दांचा ओघ मंदावला. अगदीं शेवटीं शेवटीं पुन्हां शब्द जाऊं लागले. जे शब्द आधींच वापरांत होते त्यांना वांकवून, वळवून इंग्रजीच्या शब्दभांडारांत ठीक बसतील असें करण्याकडे प्रयत्न आढळतो. नव्या अर्थछटा त्यांना चिकटतांना आढळतात. अठराव्या शतकांत इंग्रजांनीं बराच काळ आपली घडी पक्की बसविण्यांत घालविला. त्यामुळें त्यांच्या हालचाली मंदावल्या आणि पत्रव्यवहार, लेखन वगैरेवर पण त्याचा परिणाम झाला असणें शक्य आहे. या काळांतील कांहीं प्रमुख शब्द म्हणजे Jute, kincole, Cassemere, Dustak दस्तक म्हणजे दस्तखत, स्वाक्षरी. मोंगल बादशहांनीं इंग्रजांना दिलेल्या परवान्यांना उद्देशून हा शब्द प्रचारांत आला. पुढें इंग्रजी वखारींतून पण 'दस्तक' देण्यांत येऊ लागले. पुढें पुढें 'पासपोर्ट' अशाहि अर्थानें तो शब्द वापरांत होता. देशी शब्द आणि इंग्रज शब्द जोडून अर्थ व्यक्त करणारे शब्दसुद्धां या काळांत पुढें आले. उदा०— *Paddy*bird *Jute*-carpet, police-*chowky*, *Cot*-frame, *Lacquer* ware *Hookah*-bearer *Tussore* worm इत्यादि. त्याचप्रमाणें Indianize, laccate (lac पासून) अशी क्रियापदें किंवा Nobobish, nobabry, noboness असें शब्द सापडतात आले. 'Islam' म्हणजे मुसलमानी धर्म! पण, त्याला पुन्हां 'ism' प्रत्यय लावून 'Islamism' हा शब्द वापरलेला आढळतो. ('अंमलदार' नाटकांतील 'नर्व्हसनेसपणा' सारखाच कांहींसा हा प्रकार!) 'कुडतें' या अर्थी 'Bunian jacket' (म्हणजे बनिया लोकांचा अंगरखा) हा शब्द वापरण्यांत आला. कालांतरानें 'जॅकेट' काढून टाकलें आणि 'बनियन' म्हणजे अंगरखा हा शब्द रूढ झाला. असाच Loot हा शब्द. शिपायांच्या फौजांबरोबर एक बाजारबुणग्यांची फौज असे. हे लोक लढणारे नसत. फौजेला रसद पुरवीत आणि लढाई थांबली कीं सांपेल त्याप्रमाणें हात धुवून घेत. यांना 'लोटीवाले' (Lootiwallah) म्हणत. या शब्दावरूनच loot शब्द आला. कर्नाटकांत हैदरशीं झालेल्या लढायांच्या तत्कालीन वृत्तातांत या लोटीवाल्यांचा निर्देश आहे. '५७' च्या उठावणींतही हे होते. याच

# दीपावलीकडे येणाऱ्या अनाहूत साहित्यासंबंधी



**कथा–लेख**—प्रवासवर्णनें वगैरे साहित्याची पोंच देण्यांत येते. सोबत पोष्टेज असल्यास नापसंत साहित्य परत करण्यांत येतें.

पसंत पडणाऱ्या **कवितां**संबंधी स्वीकारपत्र शक्यतों महिन्याच्या आंत पाठविण्यांत येतें. नापसंत कविता सोबत पोस्टेज असल्यास परत पाठविल्या जातात. त्यासंबंधी निराळा पत्रव्यवहार केला जात नाहीं.

**सदरें** : - भाषा मराठीच, तिथें बदलला सांधा, माननीय व्यक्ति, शरीरस्य कथा रम्यः, दीपमाला, जुन्यातलें सोनें, पाणपोई इत्यादि सदरांतील साहित्याबद्दल पत्रव्यवहार केला जात नाहीं. नापसंत साहित्य परत न करतां निकालांत काढण्यांत येतें.

**अनुवाद** :—अनुवादित कथा–चुटके–आणि सदरें यांसाठीं साहित्य पाठवितांना मूळ लेखकाचा–पुस्तकाचा–मासिकाचा उल्लेख असावा. तसेंच मूळ लेखकाची वा प्रकाशकाची लेखी परवानगी लेखकाकडे असावी.

—संपादक "**दीपावली**"

काळांत इंग्रजांनीं आपल्या शिबंदीची पुनर्रचना केली. तेव्हां Shcabundee reesalah, teling, subedar, jamadar havildar, naik असे शब्द इंग्रजींत गेले. Hookah, cheelum bowdah, keddah हे शब्दहि सैन्यांतूनच अधिक प्रचारांत आले.

१९ व्या शतकांतील महत्त्वाचा शब्द म्हणजे 'khaki ! आज जगभर तो रूढ आहे. Gymkhan, jailkhana, memsabib, competionwallah असे गंगाजमनी शब्दही याच काळांतील–wallah हा प्रत्यय जोडून नवे नवे शब्द हवे तसे बनविण्याची वृत्ति बोकाळली. भंग्याला Sanitary–wallah आणि पाद्रीबुवांना 'Amen–wallah' म्हणूं लागले ! Loot, Nautch, Curry, Toddy, Juggernant, Tom–tom ही नामें क्रियापदें म्हणूनहि वापरण्यांत आलेली आढळतात. 'दाम करी काम' या आपल्या म्हणींत शिल्लक असलेले 'दाम' हें हलकें नाणें यावेळीं प्रचारांत होतें. यावरूनच 'To care a farthing' किंवा 'To care a farthing' च्या धर्तीवर 'To care a tuppence' असा वाक्प्रचार भाषेंत आला. आजकालच्या 'I don't care a damn' मध्यें तोच वाक्प्रचार रूढ आहे. वर्णांमध्यें 'ब्राह्मण' श्रेष्ठ मानला जाई. इंग्रजींत हा शब्द श्रेष्ठ श्रेणीचा निदर्शक म्हणून वापरला गेला. 'कुलशीलवान्' या अर्थी जुन्या इंग्रजींत हा वापरलेला होता आणि अमेरिकेंतील आजच्या Boston Brahmin या वाक्प्रचारांत त्याचाच अवशेष सांपडतो. उत्तम अवलादीच्या एका वृषभ विशेषासहि Brahmin Bull म्हणतात ! याच शब्दापासून Brahmanism, Brahmanicide (ब्रह्महत्या), Brahmanism असें शब्द पण साधण्यांत आले. संस्कृत साहित्य आणि तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासामुळें Karma, Maya, Dharma, Bhakti, Samadhi, Yoga, Nirvana, Mantra, Mutt, Puja, Sutra इत्यादि शब्द इंग्रजांनीं वापरले. नेपाळशीं आलेला संबंध 'गुरखा' व 'कुकरी' हे शब्द सांगतात. उत्तरेकडील फौजांत उच्चवर्णीय हिंदूंचा भरणा होता. त्यांत गंगा-यमुनेच्या दुआबांतील, 'पांडे' या नांवानें ओळखले जाणारे बरेच ब्राह्मण होते. '५७ च्या' समरांतील हुतात्मा मंगल पांडे प्रसिद्धच आहे. नंतर कित्येक वर्षेपर्यंत बंडवाल्या शिपायांसाठीं 'Pandy' हा शब्द वापरीत असत. 'डाकात' या बंगाली शब्दावरून 'Dacoit' व 'Daeoity' हे शब्द निघाले. हिंदीमध्येंहि 'डकैत' शब्द प्रचलित आहे. Pyjama हा शब्द "पायांत पेहरण्याचा कपडा" या अर्थी इंग्रजींत याच काळांत रूढ झाला. आपल्या 'जामानिमा' 'रुजामा' वगैरे शब्दांत हा 'जामा' आहेच. Charpoy, hajri, chota peg हे शब्द पण फौजेंत अगोदर रूढ झाले. Teapoy हा शब्द 'तिपाई' वरून आला. चहाचें सामान ठेवण्यासाठीं जे तिपायी छोटें मेज वापरीत त्याचेंच पुढें Tapoy झालें 'Tea' शीं त्याचा वस्तुतः संबंध नाहीं ! 'Chota peg' च्या ऐवजीं कित्येक वर्षे Chota एवढाच शब्द 'एकच प्याला' या अर्थी वापरला जात असे.

राष्ट्रीय आंदोलनानें Khilaphat, hadtal, Lathicharge, Khaddar, Svaraj, Satyagraha, Ahimsa यासारखे शब्द मिळाले. युद्धकाळांत 'Blighty' हा शब्द लोकप्रिय झाला. विलायत म्हणजे मायदेश. इथले इंग्रज अधिकारी हिंदुस्थानींत बोलत असतांना 'Home' या अर्थी 'विलायत' शब्द वापरीत. पुढें त्याची व्याप्ति मर्यादित होऊन 'विलायत' म्हणजे इंग्लंड मानण्यांत येऊं लागलें. त्यावरून 'Blighty leave' म्हणजे 'विलायतेस जाण्यासाठीं घेतलेली रजा,' Blighty bag' इंग्रजी धाटणीची पिशवी, वगैरे शब्दप्रयोग आले. हा शब्द अजून चालू नाणें आहे. असाच दुसरा शब्द म्हणजे 'Decco' 'देखो' या हिंदी शब्दावरून 'To have dekko in the things' एखाद्या गोष्टींत लक्ष घालणें' असा वाक्प्रचार आला. आज अमेरिकेंतही थोड्या अर्थांतरानें तो वाक्प्रचार रूढ आहे.

या भाषिक दत्तविधानसंस्कारांत मूळ उच्चारांत मजेदार फरक झालेले आढळतात. 'उपराज' किंवा 'युवराज' यासाठीं Upper Roger या शब्दाची निवड झाली. King of Bidar ला King of Bread म्हटलें आहे. Burhanpur चें Bram-

---

वसई–भाइंदरचे मच्छीमार लोक कोणत्याहि धर्माचे असोत. त्यांची एक निराळी संस्कृती आहे. त्यांचे आचार–विचार चालीरीति वेगळ्या आहेत. त्यांच्या बोलीतील ही पद्यमय —

## भाषा मराठीच

### लग्नाची सोयरीक

गेल्या शिनवारचे दिसा ।  
मी गेलतु बाजाराला  
भाइंदर करणी आलत्या मावर घेवला.  
एक पोरी होती तयाला ।  
दिसते जैसा सोनचाफा  
मांजे मनात वेत हाय बायको कराचाला ॥१॥  
तिच्या बापाला धारलाय मिजूत निरोप  
त्याची पोरी करावाचा  
सोयरीक करायाला माझे घरा ।  
या तुम्ही आइतवारचे दिसा  
धावदत आयली वराडाची ।  
बोली नय केली दोताची ॥  
तवा मी बोतल मला नको हायती पोरी  
समजूत करावाला माजी ।  
सासु आयले माजे घरां ॥  
तवा मी लपलू भाताचे कतग्यामदी  
मला सोदावाला माय सगले घरान फिरते  
बाजूला बोका मॅव मॅव करते ।  
तवा जिव माझा बावरते ॥  
सासु बोलते ये पुता ।  
काय दोत पाहिजे सांग मला ॥  
काकूलत करते माझा जबाब घेवाला  
मी बोतल पाजये मान ।  
मोटार सायकल फिरवाला ॥  
आणि माज वराड आयल दुसरे वाराला  
आतां वारना करते माजे वराधाचा  
वराड सोमवारचे दिसा  
मंगळवारी सगळे जेवणाला ।  
या मी भेटणार नय कोणाला ॥

---

अनुक्रमणिका







ort करण्यांत आलें. मुंबईंतील पालवा दराचें Apollo bunder झालें. मुंबईच्या भाजच्या Beach candy ला सवाशें र्षांपूर्वी 'बुर्जखाडी' असें नांव होतें. त्याचें Breach candy झालें आणि मग अर्थ उलगडेना म्हणून Beach candy असें रविण्यांत आलें. यावर ताण मद्रासला झाली भाहे. मद्रास शहरांत (मद्रासचें पूर्वीचें नांव चेन्नपट्टण; इंग्रजांनीं तेथें Fort of george ध्यें विद्यालय-'मद्रसा'-काढलें. त्यावरून मद्रास' म्हणूं लागले.) हॅमिल्टन ब्रिज हणून एक ठिकाण आहे. त्याचें लोक भाषेंत अंम्टन ब्रिज' असें झालें. पण 'अंबटन्' या शब्दाचा तामिळमध्यें 'न्हावी' असा अर्थ होतो. तेव्हां बरीच वर्षें अंबटन ब्रिज हटल्यामुळें शेवटीं इंग्रजी पाटीसुद्धां Barber's bridge अशी केली होती!! दिल्लींतील The ridge road चें रीरज रोड झाल्याचेंहि उदाहरण आहे!) अशाच प्रकारें अलाहाबादसाठीं Isle of Bat, संजाणासाठीं St. John, Bringal साठीं Brown Jolly, असे गंमतीदार बदल करण्यांत आले. रणरणत्या उन्हाची मग चुकविण्यासाठीं उत्तरेंत गवताची शेमरासारखी टोपी वापरतात. तिला शोला टोपी म्हणत. (शोला=आग) त्याचेंच इंग्रजींत 'Solar Topee' झालें आणि सूर्याचें उन्ह चुकविण्यासाठीं वापरण्याची टोपी (sunhat) असा त्याचा अर्थ सांगितला जाऊं लागला! सिराज-उद्-दौला साठीं Sir-Roger Dowler असें नांव शोधण्यांत आलें आणि शाह शुजाउल् मुल्क साठीं Cha, Sugar and Milk !! (आपल्याकडे सुद्धां Maxmuller, Hurbert, Spencer किंवा Constable यांची मोक्षमङ्ग, हरभर पेंडसें किंवा गणेश-टेबल अशी रूपें झालीं होतींच!) मूळ भाषेंतील वचनें, लिंगें वगैरेंच नियम न कळतां इंग्रजींत शब्द 'चिठी' बरोबर वापरतांना आवण 'कच्ची चिठी' म्हणूं. पण इंग्रजींत 'kutcha chit' म्हणतात. 'To Bunnow (बनाना), to lugow (लगाना), To sumjow (समझाना) असे क्रियापदी प्रयोगहि झाले. अर्थात् ते अल्पजिवी ठरले. चंपी वरून 'Shampoo' शब्द आला, त्याचें मात्र 'To shampoo' हे क्रियापद अजून कायम आहे. Average हा शब्द मुद्दां मूळ इंग्रजी नाहीं. अरब व्यापारी जहाजांवरून मालाची ने-आण करीत. त्यांतील कांहीं मालांत हवेमुळें बिघाड (आवारा) होई. या खराब मालाचें सर्व चांगल्या मालाशीं प्रमाण बसवून त्याप्रमाणें दर आकारला जाई. यालाच Average म्हणण्यांत येई. पुढें तो 'सरासरी' याअर्थीं रूढ झाला. 'बंगला' म्हणजे बैठे घर. पण आज 'A twostoreged Bunglow' असा शब्दप्रयोग कोणी चूक मानीत नाहीं. Betel या शब्दाचा मूळ मल्याळो अर्थ 'नागवेलीचें पान! पण 'इंग्रजांनीं पाना-बरोबर खावयाचें फळ' याअर्थीं सुपारीला Betelnut हा शब्द तयार केला. सुपारी-साठीं असलेला दुसरा शब्द Areca हाहि केरळमधीलच. (आपल्या 'अडकित्ता' शब्दांत तो आढळतो.) 'पाराया' म्हणजे दक्षिणेंत 'चांडाळ' इंग्रजींत 'बेवारशी, निकृष्ट, तिरस्कृत' अशा अर्थी तो रूढ आहे. उदा. भटक्या कुत्र्याला Pariah dag म्हणतात. याप्रमाणें उदाहरणें खाली तेवढी थोडींच आहेत. 'अनंत पारी किल शब्द शास्त्रम्' म्हणतात ते सत्यच आहे. आपला इंग्रजांशीं ज्या प्रमाणांत संबंध आला त्या प्रमाणांत स्वाभाविक तेवढी भर इंग्रजी भाषेंत पडली आपल्या भाषांतही इंग्रजी शब्द येत होते. त्यांच्या हकालपट्टीसाठीं चळवळी पण झाल्या आजकालच्या युगांतच नव्हे तर अव्वल इंग्रजीच्या काळांत 'न वदेत्या भाषां प्राणै: कण्ठ गतै रपि' या परंपरेंत वाढलेल्या शास्त्रीमंडळांनीं पण आपला सोंवळेपणा कायम राखण्याचा प्रयत्न केला. आमच्या शास्त्री-मंडळींनीं सवाशें वर्षांपूर्वी रचलेल्या कोशांच्या प्रस्तावनेंतील पुढील उतारा पहा: "या देशीचें राज्य पूर्वी कितीएक वर्षें यवनांनीं केलें त्यामुळें यवनीं भाषेंतील दर, तयार, रोज, सालगुदस्त इत्यादि कितीएक शब्द या भाषेंत मिसळले आहेत. ते राजकीय व्यवहाराचे अनुरोधानें आले असून राजकीय व्यवहारींच प्राधान्यें करून वर्ततात आणि तेथेंच शोभतात. इतर साधारण व्यवहारीं सरासरी बरे दिसतात, परंतु शास्त्रीय व्यवहारा-संबंधीं प्रौढ म्हणून जी भाषा तींत तर अगदींच शोभत नाहीं. याकरितां प्रौढ भाषेंत ते शब्द घेऊं नयेत." पण लोकभाषा आपल्या कोंदणांत बसतील अशी सारीं शब्दरत्नें गोळा करीत असते. अगदीं प्राचीन काळ-पासूनचे दाखले या बाबत मिळतात. अथर्व-वेदांत अ-संस्कृत शब्द अधिक हें एक कारण त्याला 'त्रयी' मध्यें स्थान न मिळण्याचें होतें. परंतु केवळ परकीय आणि अनाकलनीय म्हणून असे शब्द त्याज्य मानूं नयेत असें जैमिनीसारख्यांनीं सुचविलें होतें. जैमिनींचें 'म्लेच्छप्रसिद्धार्थप्रामाण्याधिकरण सूत्र' या संदर्भांत महत्त्वाचें आहे.

केवळ एका मनोरंजक विषयाची ओळख करून देण्यासाठीं हा निबंध लिहिला असल्या-मुळें 'भाषाशुद्धि' विषयीं चर्चा करणें विषयाला सोडून होईल. पण वरील विवेचना-वरून ध्यानांत येईल कीं इंग्रजांनीं नवीन शब्दांना आपलेसें करण्यांत कसूर न केल्या-मुळें आज त्यांची भाषा समृद्ध झाली आहे. डॉ. सुब्बाराव यांच्याच शब्दांत सार सांगा-वयाचें म्हणजे 'They (Indian word) have not left so deep or wide a mark on the English vocabulary as to modify its character...They are to the language what curry and pilay are to the daily fare —not absolutely in dispensable but certainly delicious and desirable."*

---

अधिक माहितीसाठीं—

(1) Indian words in English-G. Subba Rao. (Oxford, 1954)

(2) A History of Foreign Words In English—Mary S. Serjeantson. (London, 1935)

(3) A Glossary of Iudicial and revenue terms and of useful words etc.—H. H. wilson. Rev. Ed. (Calcutta, 1940).

(4) Hobson-Jobson—Col. Henriry Yule and A. C. Burnell. Rev. Ed. (London, 1903).

(5) Origins-Eric Partridge.

(६) महाराष्ट्र शब्दकोश, खंड १ ते ७—दाते—कर्वे.

(७) व्युत्पत्ति कोश,—कृ. पां. कुळकर्णी.

• •

अनुक्रमणिका







आणि चुनखडी सारख्या मदांध, निगरगट्ट आवाजाला जन्म देणारें तें तांबडें–तरुण तोंड फिसकन् हंसलें, जेवढें तें निलाजरें तोंड हंसलें त्याच्या कितीतरी पटीनें रुक्माची मुद्रा गंभीर झाली. या गांभिर्यानें रुक्माला नकळत तिच्या शीला भोंवती कवच उभवलें.........

# रांड मुंड

—उद्धव ज. शेळके

दोन्ही हाताचे उताणे तळवे कमरेवर रोवून, त्यानंतरचा तेवढा शरीराचा भाग दुमडून दुमडून रुक्मा वाटेनं खूप दूरवर बघत होती. वाटेचं न संपणारं टोंक दृष्टींत भरवतां येईल तेवढं भरवून घेत होती. तेवढ्यांत चुन्याच्या लगद्यानं काठोकांठ भरलेलं घमेलं तिच्या छातीपर्यंत उंचावून, पुढ्यांतला चुनखडीसारखा निगरगट्ट आवाज आपला होता तितका अधिकार खर्ची घालू लागला.

"हं, चाल घे लौकर! मगं पाहात बसजो तिकडे काय पायतं त...." आणि त्या निगरगट्ट आवाजाला जन्म देणारं तांबडं-तरुण तोंड फिसकन् हंसलं. जेवढं तें तोंड हंसलं त्याच्या कितीतरी पटीनं रुक्माची मुद्रा गभीर झाली. या गांभिर्यानं रुक्माला नकळत तिच्या शीलाभोंवती कवच उभवलं. नंतर त्या घमेलं भरणाऱ्याला कळावं न कळावं ह्या दुहेरी हेतूनं रुक्माचे डोळे त्याच्यावरून फिरून आले. दरडावून आले अन् तिलाहि नकळत तिच्या हातानं आपली जबाबदारी पेलली. डोक्यावरची वांकडी चुंभळ सरळ झाली. तीवर आदळल्यागत गचकन् येऊन बसलेल्या घमेल्याचा तोल तोलण्यांत आला. उचललेलीं पावलं जायच्या दिशेनं टाकलीं जाऊं लागलीं. चालतांना देखील रुक्माची दृष्टि सडकेचं टोंक बघून घेत होती. न संपणाऱ्या शेवटाचं म्हणून.

आवाजाच्या कक्षेंत रुक्मा शिरल्याचं लक्षांत घेऊन आपल्या हातांतल्या ओल्या विटेवर थापीचे घाव हाणणं थांबवून सखा उगाचच ओरडला.

'अआ रुक्मा! आन्तओ बिचारे चुना? का लावतं मले इथिसा दमदन कराले?"

यावर रुक्मानं आपल्या चेहऱ्यावर कोणताच परिणाम जाणवूं न देण्याची खबरदारी घेतली असलीं तरी तिची कर्तव्याच्या जाणिवेंत जखडून दुर्बल झालेलीं पावलं, गति वाढवून चालूं लागलीं. घाईनं पाय फेंकीत ती गवंड्याच्या डाव्या अंगीं गेली. घमेलं रिचवतांना तिच्यांतही गवंड्याविषयींची चीड चिडलीच.

"काहुंजी असे उगिच्याउगीच कल्ला करता! चुना आये थ्या घामिल्यांत्नी..."

यावर, आतांपर्यंत रुक्माच्या ती चुना रिचवण्यासाठीं खाली वाकली असतांना—छातीकडे बघत असलेला सखा सभ्यतेच्या जाणिवेनं स्वतःला सावरीत व त्यांत अयशस्वी होऊन लागट हंसला. न राहवून त्याच उग्र नजरेनं तिच्याकडे वरपासून खालपर्यंत न्याहाळूं लागला.

हें जाणवून रुक्माच्या घमेल्याचा आवाज झालाच. झटक्यासरशीं रचवल्या गेलेलं घमेलं हालवत–लोमकळत ती चालूं लागली. कधींहि न संपणाऱ्या येरझारींतली एक येरझार संपविण्याच्या समाधानांत रस्त्याच्या टोंकाकडे बघत बघत चुन्याच्या ढिगाशीं आल्यावर उभ्यानं घमेलं आदळलं. रिकामा झालेला हात पुन्हां कमरेंत खिसावल्या गेला. आणि कमरेवरचंच तेवढं शरीर मुडपून पुन्हां पूर्वीसारखी रस्त्याकडे बघूं लागली. तशी ती मधून मधून भरल्या घमेल्याकडेंहि बघत होती. कानांत जबाबदारीची जाणीव ठेवून म्हणा की घमेलं भरणाऱ्याच्या बोलण्यास संधि मिळूं नये म्हणून म्हणा.

तितक्यांत लुगड्यांच्या फडक्यांचं आळं गळ्याभोंवती गुंडाळलेला जन्या अचानकपणें तिच्या पाठीला म्हणाला.

"मा, मी आलो ओ!"

त्याला ओळखून तिनं विचारलं, "इतका उसीररे का बा केला?"

"तुनं सांगितलं थे थे काम केलं आन् मंग कुठिसा याले भेटलं"

"जेवलागिवला?"

"हौ"

"पोट भरलं?"

"नाई."

"का बरे?"

"तुनंच त मन्लं होतं का सर्वी भाकर नोको खाऊं, मून..."

तितक्यांत चुन्याचं घमेलं जिच्या भरदार छातीशीं आल्यानं—तें छातीला टेकविल्या जाण्याच्या भयाला भिवून ती सावध झाली. बोलण्याचं थांबली अन् घमेलं घेऊन चालूं लागली. चाल सुरू झाल्यावर ती सोबत करणाऱ्या जन्याशीं पुन्हां बोलूं लागली,

"दाड्डामाड्डा चांगलां लावला रे?"

"हौ."

"आन् कुलूप कोनं लावून देलं?"

"म्यां–म्यां—"

जन्या तिला आडवा होत व छातीवर हात ठेवून मोठ्या अभिमानानं सांगूं लागला,



अनुक्रमणिका









" म्यां सोता लावलं कुलूप..."
" हो: "
ती अविश्वासनें म्हणाली,
" तुहा हात पुरते तितल्या दूर..."
" तुही आन्त्रा ! "
जन्या तिच्या चालीनं चालतांना सांगूं लागला,
" मारत्याच्या घरची बाल्टी उबडी मारली होती..."
" असं मन्सीन त काईब्रा ! "
रुक्मा पुढ म्हणाली,
" आम् कुलूप चांगलं लावलं ? "
" हो; हें पाय बरं किल्ली ! " सोबत किल्ली असल्यांत कुलूप चांगलं लावल्या गेल्याचं लक्षण समजून जन्या भाबडेपणान मायला किल्ली दाखवूं लागला.

रुक्मा आतां दुसरंच विचारूं लागली.
" आन् कारे, बजागले फडके गिडके कितीक आन्ले ? "
यावर जन्यानं आपल्या गळ्याभोवतालचं लुगड्यांच्या फडक्यांचं आळं सोडून त्यांतलं एकेक फडकं वेगळं करून मायला दाखवूं लागला. पाहून ती म्हणाली,
" ह्यांत तेलाले सिसीगिसीरे ? "
" अरे हो. ये आनाचीच रायलीत्रा ! "
तो एकदम वळण घेऊन, घाईनं म्हणाला,
" आत्तां आन्तो ! "
" काई नोको जात बसूं इतल्या दूर आता. जन्याशानं मालक यीन अ न् चुकारा होईन..."
" पन काओ मा..."
जन्याला एकएकी आठवलं,
" तूं कायचं तेल घेसीन डोक्स्याले लवाले ? "
" घेईन लोब्रन्यामोगन्याच. "
रुक्मा थांबून, जन्याकडे वळून म्हणाली,
" अन्खीन कायचं घेऊं ? "
जन्या दुसऱ्याच तंद्रींतून बाहेर येत मायला म्हणाला,
" मा, मारत्याच्या बापानं कानाईओ मारत्यासाठीं नवं कुडतं आन्लं .."
" तुले कोनं सांगे ? "
" मारत्याच सांगत होता, मंघानी..."
यावर जराशानं, उसासा घेऊन रुक्मा म्हणाली,
" आनूं आनो त विचारा...आपल्याले लोकाचं काय करा लागते..."
वाक्य संपवतांना रुक्मानं संमतीसाठीं जन्याकडे पाहिलं—पण नेमका ह्याचवेळीं जन्या तिच्याकडे बघावयास तयार नव्हता. तेव्हां कांहीं तरी बोचवून रुक्मा त्याला विचारूं लागली.
" केवढ्याचं आये मारत्याचं कुडतं ? "
" पांच रुपयाचं..."
घाईघाईनं वाक्य संपवून आतां जन्या मायकडे अपेक्षेनं पाहूं लागला. नेमकी ह्याचवेळीं रुक्मा समोर तुडवल्या जाणाऱ्या रस्त्याकडे बघत होती. बोलत कांहीं नव्हती. जन्याकडे बघणंहि मुद्दामच टाळत होती. असा बराच वेळ गेल्यावर न राहवून जन्या आपल्या मायला भीतभीत विचारूं लागला.
" मंगओ, मा ? "
यावर भानावर आल्यासारखी दचकून रुक्मा धाडसाचं बोलली,
" पाईन लेकाले – जास्तीचे पैसे देल्ले त्या बुवानं त..."
तितक्यांत रुक्माला उशीर होतोय् म्हणून म्हणा, सख्याच्या घमेल्यांतला चुना संपला म्हणून म्हणा किंवा रुक्माची ' तलफ ' जाणवली म्हणून म्हणा तो एकदम ओरडला,
" अवो त विचारे, एक त लेकाचे लाडच करत बस—नाई त काम तरी कर !—"
तशी रुक्माची चाल बदलली. ती बदलवितांना संगच्या जन्यास घरगुतीपणानं म्हणाली,







" जाय बाप्पा जन्या. बसून राय एका जागीं—ध्या मस्याचं पोट दुखून रायलं वाट्टे ! "

" कुठिसा बसूं ? "

" बसनं, तिथिसा. "

" तिथिसा त ऊन आयेओ. "

" काई नाई होत. लागनगंत डोक्स्यावर पाळू घे गुंडाळून. "

त्याप्रमाणं जन्या गेला. डोक्याकानाला चित्रविचित्र फडकीं लपेटून उतरत्या उन्हांत बसून राहिला. रुक्माच्या येरझारांवर ध्यान ठेवून.

जराशानं साहेबांची मोटार अवतरली. मोटारींतून घाईघाईनं उतरलेले मोटारीइतक्याच अप्टुडेट ठेवणीचे साहेब बांधकामाशीं तात्पुरत्या शेडमध्यें शिरतांच पुकाऱ्यास सुरुवात झाली. ठराविक खोटा, चिठ्ठर घेऊन एकेक माणूस तिथून ये-जा करूं लागला. उरलेलीं माणसं, बायका—आपापल्या 'नंबर'ची वाट बघत अंगणांत, कुणी विटांच्या ढिगाऱ्याशीं, कुणी विटा भिजवण्याच्या पत्र्यानं भरलेल्या—पीपांवर टेकल्या, रेल्व्यासारखी बसलीं होतीं. कानांना 'शेड'च्या स्वाधीन करून. पानतंबाखूच्या देवाणघेवाणीची बतावणी करीत.

त्यांच्यांतच जन्याला पुढं टेकवून रुक्माहि ठेवणींतल्या वस्तूसारखी बसून होती. बसल्या बसल्या ती बोटांचीं कांडीं मोजत होती. पुन्हां पुन्हां असं कितीदां झालं कुणास माहीत—पण नंतर मात्र तिनं कांडीं मोजण्याचा पिच्छा सोडून दिला. उभ्या गुडघ्यावर हनुवटी ठेवून अन् तिथून दिसणाऱ्या विटांच्या विस्कळीत ढिगाऱ्याकडे शून्यशा नजरेनं बघूं लागली. तशी ती कितीतरी वेळ बघत बसली असती—पण तिचा 'नंबर' आल्याचं कुणाकडून तरी सुचवल्या गेल्यानं ती भानावर आली. घाईघाईनं शेडकडे—आंत जाऊं लागली. चालतांना एकाएकीं लक्षांत आल्यानं आपल्या मांडीवरच्या लुगड्याला गांठ घातली. मग आखूड लुगड्याला पोटऱ्यांपर्यंत सरकविण्याच्या, सावरण्याच्या बोथट प्रयत्नांतच ती शेडमध्यें पोंचली. तिला बघून-पण हातांतल्या हजेरीवरून लक्ष न काढतां एकजण म्हणाला,

" चार रुपये, साडेसात आणे ! "



साहेबांच्या हातांतली रक्कम हातीं पडल्यावरहि रुक्मा ति घुटमळत राहिली तेव्हां हजेरींतले डोळे तिच्यावर रो मुकादम म्हणाला,

" काओ, हिशोब तुह्या धानांत नाई आला काय ? "

" आला... "

लुगड्याच्या कांठांतली वळी काढतांना मोठ्या हिय ती बोलली,

" सायेब-मी मनत होती का मले या हतीं दोनक रुपये आंगा द्या...पुडच्या हप्ती घेजा कापून... "

हें ऐकून घेण्यापूर्वीच साहेबांचा एक पंजा हवेंत, डमरू वाज तसा हलवल्या जाऊं लागला. चेहऱ्यावर कठोर निर्धार वाढूं लाग त्यामुळं रुक्मा ढकलून लावल्या सारखी बाहेर आली. चिमणीए तोंड करून. तिची वाट बघत असलेला जन्या तिच्या चेहऱ्या दुर्लक्ष करून घाईनं म्हणाला,

" काओ मा ? देल्ले ? "

" नाईनारे बाप्पा ! "

हें पाहून बाजूची कचरी म्हणाली,

" काओ, काय झालं ? "

" काई नाई ओ बिचारे ! "

या आरंभानं बोलायला सुरवात करून रुक्मानं सारं सांगून टा अन् शेवटी वाऱ्यावर बोलावं तशी पुटपुटूं लागली.

" म्यां इचार केलता का मायल्यानं दोनक रुपये आंगावर दे अस्ते त पोट्ट्यासाठीं एखादं कुडतं तरी घेतलं अस्तं. दिवाई सां सन आये, मून केले माय सोन्याचे दांत कन्यावानी ! "

हें ऐकत असलेला सखाराम गालांत वेटोळ्या घेणारी जीभ थ वून अन् चेहऱ्यावरील लागट हंसण्याऐवजी निर्जीव गांभीर्य पसर रुक्माला विचारूं लागला,

" क्यूं ? क्या बात है ? "

" काई नाई. "

" तो भी ? "

" काई नाई जी ! "

आणि नंतर जन्याला झटक्यानं म्हणाली,

" चालरे पोट्ट्या, बजारांत चालतं काय त... "

तरीहि सखाराम म्हणत होता, " इत हीच अडचन अ दोनचार रुपये माह्यापासून घे आत्ताचे... "

जन्यानं धरून आणलेलीं फडकींबरोबर असल्याची खात्री करत ती सखारामला झटक्यांत म्हणत होती.

" नाई लागत... "

" काबाओ ? "

" काबा अन् काय कयची ? "

आतां मात्र तिच्यांतही त्यांच्याविषयींची चीड स्पष्टच सूरांत आ

" नाई लागत मनलं का चुकलं...जन्या, चालनं उठनं मर लौकर... "

जन्याला पुढयांत धावून चालवतां चालवतां रुक्मा दुकानओ चालूं लागली. बरंच चालून झाल्यावर तिचं लक्ष एका तयार व

अनुक्रमणिका







डयांच्या दुकानानं तावून धरलं. दुकानांत लोमकळणाऱ्या तयार सदऱ्यांच्या रांगेकडे ती आश्चर्यानं बघूं लागली लागली. हें लक्षांत घेऊन दुकानांतल्या, गादीवरच्या सांईनं हातांतलं ऊर्दू वर्तमानपत्र सोडून मोठ्या तत्परतेनं रुक्माला म्हणाला,

" क्या होना बाई ? "

रुक्मानं जन्याच्या डोक्यावर हात ठेवतांना व दुसरीकडे लोमकळणाऱ्या सदऱ्यांच्या रांगेकडे बघतांना म्हटलं,

" यांच्या आंगचं एखादं आंगडं असन त दाखवा बरं!—सस्त्यांतलं दाखवजा ! "

पुढयांत आलेल्या चार सहा सदऱ्यांतला एक जेमतेम जन्याला होईल असा सदरा हातांत धरून रुक्मानं भीत भीत भाव विचारला,

" याचे काय द्या लागन ? "

" पांच रुपये. "

ऐकतांच रुक्माच्या हातचा सदरा दुकानदाराच्या दिशेनं फेकल्या गेला. आणि ती चालण्याच्या तयारींत लागली—तसा साई म्हणाला.

" तूं क्या देती ? "

ती न थांबतां म्हणाली.

" एवढ्या महागाचं नाई लागत... "

" फिर कितने तक होना तो ? "

" लागतच नाई. "

रुक्मा बेफिकिरीनं चालत असल्याचं पाहून जागचा साई जीव ओतून चिवटपणें ओरडला.

" कमसे कम मूंसे तो बोल तेरेकू कितने तक होना, तो ! "

यावर केवळ बोलावं म्हणून तिनं आपली अपेक्षा सांगितली.

" मले वाटलं का रुपया दीडरुपयापर्यंत भेटत असन मून... "

" रुपया भी कायकू देती... "

" हातांतल्या सदऱ्याला त्याच्या जागेवर लावतांना साई झटक्यानं—मोठ्यानं म्हणाला.

" ले जाना बेसाई... "

नंतरहि तो जें काय बोलला तें न ऐकल्यासारखं करून रुक्मा चालूं लागली. टांगाअड्डयाशीं आली. तिथं रस्त्याच्या कडेला एक बुंध्रुकसं वडाचं झाड होतं. त्याच्या भरीव सांवलींत पाण्याचं हळं होतं. हळ्यांत नळ सुरू होता व हळ्याच्या पुढ्यांत चिखलाचा लगदा होता. त्याच्या डाव्या अंगीं म्हशी आणि घोडे भादरणारीं माणसं बसत असत व उजव्या अंगीं माणसं भादरणारीं माणसें बसत असत. आपापल्या धोपट्या व अवजारे पसरवून. पण ह्यावेळीं त्यांनींहि आपापलीं अवजारें आवरलीं होतीं. नाहीं म्हणायला एकजण एका घोड्याचे केंस उभ्याउभ्या भादरत होता. एक न्हावी शेवटचं म्हणून आपल्या वस्तऱ्याला पोटरीवर घासत होता. हें लक्षांत घेऊन रुक्माला जन्याच्या हजामतीची आठवण झाली.

" जन्या, तुई हजामत तरी बे लौकर करून—नाई त दुकान बंद होईन... "

" आतां झांक पडूली. सकाय करन... "

" सकाई नाई करूं येत बाप्पा ! " ती जन्याला चुपकारू लागली, " सकाई पयलं न्हान आये ! "

तसा त्या वस्तरा पाजळणाऱ्या न्हाव्याकडे जाऊन आलेला जन्या मायला म्हणाला,





अनुक्रमणिका

( पान १५ वरून चालू )

मिळकत घेऊन, खणा लुगड्यांचं बोचकं खांद्यावर टाकून तो घराकडे परते. आम्हीं आपापल्या चढणीला लागलों होतों.

या साऱ्याचा पांडूवर फार परिणाम झाला. त्यानं रचलेले मनोरे पार धुळीला मिळाले होते. मॅट्रिकनंतर नोकरी करण्याचं, पैसे मिळवण्याचं त्याचं स्वप्न असं डोळ्यादेखत वितळून गेलं होतं. त्याचा उकळता रस त्याला अजून चटके देत होता. उजाड माळासारखं त्याचं मन भकास झालं. त्यावर तो टिपं गाळूं लागला. माळावरल्या पावसाचा कधीं कुणाला उपयोग झालाय् कां? ओझं लादलेल्या गाढवासारखा तो खालीं मान घालून वाटचाल करूं लागला. राहात्या गांवांत धंदा नीट चालेना म्हणून बोजा घेऊन तो गांवच्या पंचक्रोशींत हिंडूं लागला. आम्ही सारेच पांगलो.

इतकं झालं तरी पांडू अधुनमधून मालतीला भेटतच असे.

पांडूचे वडील आतां म्हातारे झाले होते. आभाळाकडे डोळे लावून ते आतां शेवटच्या दिवसाची वाट पाहात होते. कसल्यातरी रेंगाळणाऱ्या काळ्या सावल्या त्यांच्या सुरकुतलेल्या चेहेऱ्यावर तरंगत होत्या. त्या वृद्ध वृक्षाचा वसंत सरला होता. कुठल्यातरी बारीकशा झुळकीनेंहि तो आतां उन्मळून पडणार होता.

पांडूच्या आयुष्यांतील झालेले बदल त्यांनी दुरून पाहिले होते. कांहीं त्यांना बाहेरून समजले होते. पांडुवर त्यांचा जीव होता. ते त्याला चकार शब्दानं बोलले नाहींत. डोळे मिटून बघत राहिले. कान पाडून ऐकत राहिले. 'ठ्याच लागल्याव् आमुक डोळं उघडतील...' असं म्हणून ते गप्प राहिले. मुक्या मनानं ते अश्रु ढाळत राहिले.

रात्रीचा पाठलाग करीत दिवस धांवत होता.

आणि एक दिवस पांडूच्या घरावर टिटवी ओरडली. पांडूचे वडील गेले. एका मरत्या संध्याकाळीं त्यांनीं या जगाचा निरोप घेतला. त्यांची यात्रा संपली. बरोबरच्या टाळकऱ्यांना मागें ठेवून ते एकटेच पुढं चालते झाले. मरत्यावेळीं ते पांडूला एवढंच बोलले, 'पोरा, चाललों आमी. सांबाळा नीट. बाईचा नाद लई वंगाळ, पोरा...'

ओठापर्यंत आलेले शब्द ओठाबाहेर आले नाहींत. पांडूच्या घरांत एकच कल्लोळ माजला. त्याच्या घरावर कुऱ्हाड कोसळली वृक्ष उन्मळून पडला. घरटं ओस पडलं पांडू पोरका झाला.

आम्ही त्याच्या घरीं गेलों. त्याचे सारे आत त्याच्या वडिलांच्या मयताला जमले होते. पण नेटानं पुढं कुणी होत नव्हतं. पुढं व्हायचं म्हणजे पांच पंचवीस रुपयाला चाट बसायची. कारण वडिलांच्या मयताला खर्च करायला पांडूच्या घरांत एक दिडकीहि नव्हती. म्हाताऱ्यानं कुठं काय ठेवलं असेल तें कुणाला माहित नव्हतं. तें बघण्यानी ती वेळही नव्हती. लोक लांबडे चेहेरे करून बसले होते. वेळ जात होता.

तेवढ्यांत एक पांढरं पातळ नेसलेली ब्राह्मणाची बाई खोकत खोकत पांडू बसला होता तिथं आली. तिचे डोळे रडून रडून तांबडे लाल झाले होते. पंचवीस रुपयाच्या नोटा तिनं पांडूच्या हातांत दिल्या अन् ती रडक्या स्वरांत बोलली—

'धीर धरा. असेच प्रसंग आयुष्यांत येतात. त्यालाच तोंड द्यायचं असतं. हे पैसे घ्या. कांहीं मनांत आणूं नका. होतं तें सारं आज पांडुरंगार्पणमस्तु केलंय. येते मी...' ती वळणावर नाहींशी झाली. अज्ञातांत विलीन होणाऱ्या निरंजनाच्या ज्योतीसारखी मला ती वाटली.

पांडूच्या वडिलांना भडाग्नि दिला. त्या भडकलेल्या ज्वाळांत मला पांढरं पातळ नेसलेली मालती सारखी दिसत होती.

दुःखाचा पूर ओसरेपर्यंत पांडूला आम्हीं भेटत राहिलों. त्याला धीर देत राहिलों. एक दिवस पांडूनं आपलं बोचकं उचललं आणि तो बाजाराकडे गेला. फिरून तो धंद्याला लागला.

दिवस जातां जातां त्याला एके दिवशीं एक पत्र आलें. पत्र त्याच्या मेव्हण्याचं होतं. मेव्हण्यानं त्याला मुंबईला बोलावलं होतं. मेव्हण्यानं वशिला लावून एस. टी. खात्यांत एक जागा मिळवली होती. पांडू मुंबईला जाऊन आला. पहिल्या तारखेपासून कामावर हजर राहण्याचा त्याला हुकूम मिळाला होता.

पांडू आपला गांवांतला बिस्तरा घेऊन जाण्यासाठीं पुन्हां गांवीं आला. आमच्यापासून तो आतां दूर जाणार होता. भरल्या डोळ्यानं त्यानं आमचा निरोप घेतला. आईकडं लक्ष द्यायला सांगून तो बोलतां बोलतां पुढं म्हणाला, 'मालूनं मला आयुष्यांत त्याग करायला शिकवलं. स्वतः जळून दुसऱ्याला प्रकाश द्यायला तिनं मला शिकवलं. मी तिला कधीं विसरणार नाहीं. माझ्या आयुष्याला आतां चांगलं वळण मिळेल ......'

पांडू निघून गेला. दौंडला एस. टी. डेपोंत उमेदवारी करूं लागला. आम्हीं त्याचा भविष्याबद्दल निश्चिंत झालों. तो आतां पोटाच्यामागं लागला होता. त्याला मार्ग दिसला होता. तो सांपडलाहि होता. तो वाटचाल करूं लागला. आम्हीहि आमच्या उद्योगांत मग्न होतों. जो तो आपापल्या मार्गाला लागला होताः आम्हीं सारेच आतां दुरावलों होतों. कसल्यातरी अदृश्य भिंती आतां आम्हां साऱ्यांमध्यें उभ्या राहिल्या होत्या. काळ चालला होता. पांडूची अधुनमधून त्याच्या आईला पत्रं येत असत. त्यावरून त्याची आम्हांला खुशाली कळत असे. पण तेवढीच. जुन्या गोष्टी भूतकाळाच्या पडद्यांत जात राहिल्या. नवीन गोष्टींनीं त्यांची जागा घेतली. दोन तीन वर्षे उलटून गेलीं...!!!

पांडूच्या आयुष्याची परिणती इथं व्हायला हरकत नव्हती. दोन-तीन वर्षे गेल्यावर आम्हांला तसं वाटलंहि होतं. पण तसं घडलं नाहीं. आमचा हिशेब चुकला. मनीं आलं तसं झालं नाहीं. एक अज्ञात कुशल हात पांडूची कथा लिहित होता.

पांडूच्या हेकट आयुष्यानं एक नवीनच गति घेतली होती. काय होणार होतं कोण जाणे! पांडू नवीन एका बाईच्या नादीं लागला होता. ती त्याला खेळवत होती. तिच्यासाठीं पांडू दौंडाहून पुण्याला दर सुटीच्या दिवशीं येत असे. दोन दिवस चैन करीत असे. मजा लुटत असे. पुन्हां दौंडला जात असे. वासनेच्या गर्तेत आज पांडू गांडुळासारखा वळवळत होता. त्याला मागें खेंचायला आतां कुणीच नव्हतं. मला हें सारं कळत होतं. मी ऐकत होतों. पण मला मार्ग कांहींच दिसत नव्हता. घट्ट मन करून मी सारं ऐकत राहिलों.

परवां पांडू आपल्या वडिलांच्या श्राद्धाला गांवीं आला, तेव्हां मीं त्याला विचारलें,

( पान ३१ वरून )

"मा, थो त दुकान बंद् झालं मन्तेओ !"

यावर रुक्मानं विचार केला व स्वतां जाऊन न्हाव्याला आळवून बघूं लागली. पण अंधार पडल्यानं, आपल्याला हजामत जमत नाहीं हें धरून बसलेल्या न्हाव्यानं तिची बोळवण केली. नाईलाजानं जन्याला घेऊन रुक्मा पुढं चालूं लागली. जरासं चालून नाहीं होत तर एका आधुनिक पद्धतीच्या सलूनकडे हात दाखवून जन्याला म्हणाली,

"थ्या दुकानांतून पुसून ये वरं...तुझ्या हजामतीचे काय द्या लागन मून..."

जन्या परतल्यावर म्हणाला.

"मा, थोत साहा आने मंते ओ..."

"साहा आने ?"

रुक्माला धक्काच बसला,

"चार आन्यांत नाई करत काय ?"

"नाई."

यावर जराभर ती बोललीच नाहीं. जरासा विसावा घेतल्यागत करून पुढं चालूं लागली. कासराभर चालून होत नाहीं तर नव्यानं जन्याला म्हणाली,

"जाय. ये लेकाले करून."

ऐकून सवरून जन्याचा, मायच्या धाडसावर विश्वास बसला नसावा. तो कमालीचा सूर ओढून विचारूं लागला,

"साहा आन्यांत ओ ?"

"हौ जाय ! पायल्या जाईन लेकाले जें होईन थे !"

---

( पान ३२ वरून )

'पांड्या, तूं हें काय चालवलंयस ? आयुष्यांतून उठण्याची वेळ आली तरी तूं झोंपलायस काय ? बास झालं आतां...'

पांडूनं आतां नवीनच पवित्रा घेतला होता. डोळे फाडून माझ्याकडें तो पाहातच राहिला. जणूं त्याला म्हणायचं होतं—'पम्या, गत आयुष्यावर मी हा सूड घेतोय. साऱ्या स्त्रीजातीवर मी आतां सूड घेणार आहे. मुद्दामच आपल्या घरापासून मीं सुरुवात केली आहे. आणि लक्षांत ठेव, याचा शेवटहि तुमच्या कुणाच्या तरी घरीं होणार आहे ..'

पांडू निघून गेला. आधींच पांच-सहा फूट उंच असलेला पांडू मला आमच्या पिंपरणीएवढा उंच झाल्यासारखा वाटला. आपल्या सहस्र हातांनीं तो साऱ्या स्त्रीजातीची अब्रू घेतोय असं दृश्य माझ्या डोळ्यांसमोर उभं राहिलं.

मला दुसरं कशाचं वाईट वाटलं नाहीं. पण आम्हीं जियं खेळलों, नाचलों, दंगा केला, बालपणांतला रम्य काल आम्हीं ज्या घरीं काढला, त्या अण्णा सोनाराच्या पुण्यांतल्या वाड्यांत्या भावजयी बरोबर तो आज मजा लुटत होता.

आज पांडुरंगाच्या मनांत काय आहे देव जाणे !

• • •



शरीररम्य कथा रम्य:

# नासिका : २

रा. वि. सोवनी M. Sc.

चुंबनानें "तोंड ओळख" होते. ती आचरण करून घेतली आहे आणि त्यानी चवहि चाखली आहे. तेव्हां सहाजिकच रुचिनंतर गंध आलाच. किंबहुना ह्या दोन्ही संवेदना बरोबरच होतात. गंध संवेदनांचें स्वागत करण्याचें काम नाकाकडे असते. हें नाक मोठ्या दिमाखानें ( अर्थात् म्हशीनें पाय दिला नसल्यास ) मिरवीत असते. ह्या राजेश्रींचा जरी रुबाब असला तरी त्यांच्यामधील गंध ज्ञानाला आपण फारसे महत्व न दिल्यामुळें उच्चपदस्थ असून गौणत्व आले आहे.

कुत्रा, वाघ, सिंह, मांजर इत्यादि चतुष्पाद प्राण्यांमध्यें नाकाला फार महत्व आहे. कारण नाकाकडून मिळणाऱ्या गंध ज्ञानावर त्यांचें सर्व कार्य अवलंबून असते. त्यांचे जगच गंधाचे असते. तर आपले जग दृष्टी आणि आवाज ह्यांचे आहे. कुत्र्याला घेऊन तुम्ही छोटासा फेरफटका करून आल्यावर तुम्ही, फिरावयास गेलेली जागा, दृश्य आणि आवाजाच्या संवेदनात लक्षांत ठेवाल तर कुत्रा तीच जागा गंधाच्या संवेदनांत लक्षांत ठेवील.

नाकाच्या पोकळीचें दोन भाग कूर्चेच्या एका उभ्या पडद्यानें केलेले आहेत. ही कूर्चा लवचिक असल्यामुळें नाक मुरडण्यासाठीं किंवा नाकाला वळसा घालण्यासाठीं तिचा उपयोग होतो. मला वाटतें कीं स्त्रियांमध्यें ही कूर्चा जरा जास्तच लवचिक असावी. नाहींतर ती केव्हांच मोडून पडली असती. ह्याच कूर्चेची लांबी कमीजास्त करून नाकाचा शेंडा चढविण्याची सोय प्लॅस्टिक सर्जरीनें केलेली आहे. गालांच्या दोन बुरुजांत हें नाक एखादवेळेस दडल्यास त्याचा उद्धार करण्याची सोय आधुनिक शस्त्रविद्येनें केलेली आहे.

नाकाचें मुख्य काम म्हणजे हवा गाळून व गरम करून फुप्फुसांकडे पाठविणें. ह्या कामांतच गंधज्ञानाचेंहि काम तें करतें. नाकाच्या वरच्या बाजूस तीन वलयाकृति कूर्चा मध्यवर्ति कूर्चेला जोडलेल्या आहेत. ह्या वलयांतील सर्वात वरच्या वलयांत गंधज्ञान ग्रहण करणारे ज्ञानतंतू आहेत. तंतूंभोंवती श्लेष्मासारखा द्रव पदार्थ आहे. हवेबरोबर येणारे गंधकण ह्या द्रव पदार्थांत विरघळतात आणि मग गंधाचें ज्ञान मेंदूकडे पाठविले जाते. ह्या तंतूंची जागा अडचणींत असल्यामुळें गंधकण तेथें जाण्यासाठीं श्वास जोरात घ्यावा लागतो.

रुचिप्रमाणेंच गंधाचें पांच सहा प्रकार आहेत. फुलांचा गोड वास, कुजका वास, जळका, भाजका, चटकदार, आणि स्पिरीट सारख्या चटकन उडणाऱ्या पदार्थांचा वास असे हे प्रकार आहेत. ह्यांतील कांहीं वास सौम्य असतात तर कांहीं तीव्र असतात. कुजका








वास किती तीव्र असतो ह्याची कल्पना आपल्याला आहेच. कस्तुरीचा वास अति तीव्र असतो. एका मूठभर कस्तुरीत तीस लाख दारूच्या बाटल्या सुगंधित करतां येईल. अत्तरांमध्यें उडून जाणारे पदार्थ असल्यामुळें त्याचा घमघमाट सगळीकडे पसरतो.

प्रत्येक व्यक्तिला त्याचा स्वतंत्र वास असतो. आणि कुत्रा आपल्या मालकाला व इतरांना ह्या वासावरून ओळखतो. कस्तुरीमृग आपल्या सुगंधी गुणानेंच प्रेयसीला आकर्षित करतो. म्हणूनच कस्तुरीमुळे लैंगिक भावना उफाळून येतात. गंधाचें कण जड आणि मोठ्या अणूंचें बनलेले असतात. त्यामुळें त्यांना पदार्थांत मिसळण्यास वेळ लागतो. त्या गुणामुळेंच गंध जास्त काळ रेंगाळतात. कपड्यांना गंध फार चिकटतो. विशेषतः रंगीत कपड्यांना तो जास्त काल चिकटून राहातो. तंबाखूचा वास असाच तीव्र आणि रेंगाळणारा असतो. तेव्हां ऑफीसमध्यें दुपारी ओढलेली सिगारेट संध्याकाळी "घरीं" सेहज कळूं शकते. त्यासाठीं पांढरे कपडे वापरल्यास धोका कमी असतो कारण पांढऱ्या कपड्यांवर गंध फार वेळ टिकत नाहीं.

एखादा वास फार वेळ घेता येत नाहीं. कारण कांहीं वेळानंतर त्या वासाचें ज्ञानतंतू थकतात व आपले कार्य थांबवितात. अर्थात मधे थोडावेळ विश्रांति मिळाल्यास तो वास पूर्ववत जाणता येतो. थोडा थोडा वेळ थांबून निरनिराळे वास घेण्याचें शिक्षण घेतल्यास आपण "गंध तज्ञ" होऊं शकूं. कांहीं अनुभवी डॉक्टर्स नुसत्या वासानें रोगाचें निदान करतात. त्या बाबतींत गेल्या शतकांतील एका प्रसिद्ध डॉक्टरची गोष्ट टांगतात. हे डॉक्टर एका मुलीला तपासावयास गेले तेव्हां मुलीच्या आईनें त्यांना रोग्याच्या खोलीकडे नेले. तेथें गेल्यावर डॉक्टरची खोलीचें दार नुसते किलकिले करून खोलीचा वास घेतला आणि सांगितले कीं मुलीला स्कार्लेट फीवर झालेला आहे.

शरीरात हवा श्वसनासाठीं नाकामधून घ्यावी लागते. ही हवा श्वासनलिकेमार्फत फुप्फुसात जाऊन पोंहोचते. श्वसनाच्या कार्यात नाकाला मदत करण्यास तोंड पुष्कळ वेळा उघडते. विशेषतः शरीरातील उत्सर्जक वायू जास्त झाला असल्यास तो जादा प्रमाणांत शरीराबाहेर टाकण्यासाठीं तोंड उघडले जाते. ह्यालाच जांभई म्हणतात. ह्यावेळीं चेहऱ्याच्या हाडांवर ताण पडतो. व नाक आणि डोळा ह्यांच्यामध्यें असलेल्या हाडाला धक्का बसतो. ह्या धक्क्यामुळें अश्रुपिंड दाबले जाऊन डोळ्यात अश्रू जमा होतात. नक्राश्रूंची कथा ह्यांतच दडलेली आहे. सुसर किंवा मगर अन्नग्रहणासाठीं तोंड खूप वासते त्यावेळीं अश्रुपिंडाला धक्का बसल्यामुळें तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहात.

नाकामधून जाणाऱ्या हवेमध्यें कांहीं सूक्ष्म कण असल्यास ते वरच्या भागात अडकतात व ते बाहेर फेकून देण्यासाठीं शिंक येते. त्याचप्रमाणें श्वासनलिका व फुप्फुस ह्यांमध्यें कांहीं कण गेल्यास किंवा त्या ठिकाणीं दाह झाल्यास खोकला येतो. अर्थात् मुद्दाम खोकला काढण्याचें वेळीं ह्यांची जरूरी भासत नाहीं. आपल्या नाकालाच नेहमीं पडशाला तोंड द्यावें लागतें. कारण पडसें थंडी झाल्यामुळें होते व नाकांतील श्लेष्मा सारखा वाहूं लागते. कांहीं वेळा ती अजिबात थांबते व नाक कोरडें पडतें.

नाकामुळें जरी गौणत्व प्राप्त झालेले गंध ज्ञान होत असले तरी त्याच्यामुळेंच मानवाला त्याचें व्यक्तिमत्व आले आहे ह्यांत शंका नाहीं. ● ●

रुक्मा कमालीच्या धाडसानं म्हणाली, "मले काय धा-पांच लेकरं थोडेच आये..."

जन्या सलूनकडे निघून गेल्यावर ती आपलीं फडकीं पोटाशीं गुंडाळून, वडाच्या बुंध्याला टेकून बसून राहिली. सलूनमधल्या खुर्चीतल्या जन्याकडे अभिमानानं न्याहाळीत. अर्ध्याक तासानं तोंडावरच्या पावडरला हात लावत लावत जन्या तिच्याकडे आला. त्याला पाहून ती उभी झाली. त्याची हजामत कौतुकानं की जन्यासारख्या लेकराच्या जातीला न्हाव्यानं फसवलं नसल्याच्या जाणीवेनं न्याहाळूं लागली. खात्री झाल्यावर पुन्हां त्याला फरफरट ती बाजारच्या वाटेनं लागली.

तिथं येतांच पहिल्यांदा सुदल खंड्यांच्या न्होंच्यांकडे वळली. तीन खोंच्यांवर भाव पाहिल्यावर एकाशीं उभी झाली. सौदा घेऊं लागली. अर्धा पाव मुंगफट्टी. छटाकभर जाडी सेव. अर्ध्या पावाच्या वजनांत कांहीं बेसनाची, कांहीं मुगाचीं, कांहीं कोवळ्याचीं खारीं भजीं घेतलीं. त्याच्या पुड्या फडक्यांत बांधून झाल्यावर एक उडदाचा तळलेला पापड घेतला. तो जन्यापाशीं, उघडानागडा दिला व पुन्हां चालूं लागली. धान्याच्या ओळीकडे. ह्यावेळीं जन्या रस्त्यांतल्या फटाक्यांच्या पालीकडें—खूप खोलवर, बघत होता. गर्दीच्या फटींतून त्याला रंगीबेरंगी फटाक्यांच्या डब्यांची आकर्षक चळत दिसत होती. त्यामुळं चालतांना त्याचीं पावलं अडखळत होती. असं फटाक्यांच्या सर्व पाली संपेपर्यंत चाललं. त्या संपल्यावर न राहवून जन्मानं मायफलं अंतर, दुडुदुडु चालत जाऊन कमी केलं अन् हलकेंच म्हणाला,

"मा मले फटाके घेऊन देनं ओ !"

"मले नेऊन ठिवनं ध्या फटाकेवाल्यापाशीं—"

पहिल्यांदा एकाएकी असं गुर्कावलेली रुक्मा लगेच, किंचित्‌शा समजूतवारपणानं म्हणाली,

"आये तितले पैसे फटाकेवाल्याच्या मढ्यावर घालतो आन् हताभर वारा भकसजो—"

जन्या कांहींच बोलला नाहीं. मागच्या चालीनं फरपटल्या जाऊं लागला. पण ध्यान सरत्या पालींवर लोमकळवून. चालण्यापुरता रस्ता पाहून ठेवल्यावर—तो संपेतोवर मागच्या पालींकडे बघत. हें जोखून रुक्मा कणवली,

"चाल बरं, पाऊं काय भाव आयेत—"

जन्या एकदम आनंदला. पाहतां पाहतां तीं मायलेक एका पालीशीं गेली. गर्दींत तोंड खुपसलं. तसं तें जन्यानंहि खुपसलं. तक्तपोसाशीं टेकलेली रुक्मा जवळच्या जन्यास त्याची पसंती विचारूं लागली.

"सांग, काय पायजेत..."

तसा जन्याच्या उजव्या हातचा पापड डाव्या हातीं घेतला गेला व रिकामा झालेला हात दुकानांतल्या एका फुलबाज्याच्या डब्याकडे धांवला. हें हेरतांच दुकानदारानं जन्याच्या हातांतला डबा अधाशासारखा ओरबाडतांना म्हटलं.

"रख ओ पॅकेट वहांपर..."

"त बाप्पा, इकत घेतोना..." रुक्मा म्हणाली.







अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





" सांगा, काय द्या लागते, त्याचं ? "

" जाय जाय ! "

दुकानदार वेडंवाकडं तोंड करून तिच्यावर ओरडला,

" मोठी आली घेनेवाली—जाय ! "

चौताळलेल्या रुक्मानं दुकानदारावर डोळ्यानं आग ओतली. बोलली मात्र जन्याशीं,

" चालरे बाप्पा ! नाई त खाऊन घेसीन त्याईच्या दुकानांतले सगये फटाके..."

गर्दीतून बाहेर आल्यावर जन्याला हातानं कुरवाळतांना व शब्दानं समजावतांना म्हणाली,

" काय करतं बाप्पा थ्या फटाक्याच्या मढयावर पैसे घालून ! थेव पैसे नरतीन त पोटाले खाजो. "

मग ती बाजारहाट करूं लागली. धान्य घेतलं, एक पैशांत अगरबत्ती अन् कापूर घेतला. दोन पैशांत 'लक्ष्मीपान' घेतलं शेरभर लाह्या, दोन पैशांचे बतासे वगैरे घेऊन झाल्यावर 'दिवाळींत' कांहीं उणीव राहिली नसल्याची खात्री झाल्यावर ती घरीं आली. हातांत गाठोडीं ठेवून होत नाहीं तर जन्याला त्याच्या अंगांतला सदरा काढायला सांगितला. म्हणाली,

" धुवून आनतो ? "

" आतां ? "

" हो. उद्या न्हानं झाल्यावर घालाले नाई लागन काय ? "

" अरे हो. "

त्यानं काढलेला सदरा घेऊन ती बाहेर जाऊं लागली—तेव्हां भीति वाटण्याच्या सबबीवर तो तिच्या मागं लागला—तेव्हां त्याला शेजारच्या मारत्याकडे बसून राहायला सांगून ती दोर बादली घेऊन विहिरीवर गेली.

जन्याचं कुडतं धुवून ती परतली त्यावेळीं जन्या मारत्याशीं गप्पांत रंगल्यासारखा दिसत होता अन् नव्हताहि. कारण तो जन्याशी बोलल्याचं भासवत असला तरी त्याचं लक्ष मारत्याच्या मायनं चुलीवर मांडलेल्या कढईवर होतं. त्या जवसाच्या तेलाच्या सोनेरी फेंसांत करंज्या पोहत होत्या. मायच्या हांकेनं भानावर आलेला जन्या जड पावलानं घरीं आला त्यावेळीं त्याची माय त्याचं कुडतं वाळत घालत होती. जन्या हें सारं निर्जीव डोळ्यानं बघत होता. मायच्या बोलण्याला नुसत्या हां हूं वर निभवत होता. हें लक्षांत आलेली रुक्मा त्याच्यावर वस्कन् ओरडली,

" त मस्न्या, आतां अन्खीन काय कमी पडलं तुहं त असा सुतक्यावानी तोंड करून बसला, आ ? "

जन्या कांहींच बोलला नाहीं. तसा तो मायचं सारं काम होई-पर्यंत मौनात राहिला. शेवटीं रुक्मानं सारं आटोपल्याची खात्री झाल्यावर निजायला म्हणून वाकळ पसरवली. जन्याचं खा-पे झाल्यावर स्वतः त्याच्यापाशीं जाऊन आडवी झाली. त्याला पोटाशीं धरून मोकळवण्याच्या सुरांत म्हणाली,

" आतां अन्खीन काय व्हाचं रायलं तुह्या मनाजोगतं ? "

असं दोनेकदां झाल्यावर जन्या तिच्या विश्वासांत जाऊन मनांतलं सांगूं लागला,

" मा, मारत्याच्या घरीं का नाई त खाजि-करंज्या केल्याओ ! "

" करूं केल्यात...त्याचं आपल्याले काय करा लागते...म्यां नाई तुयासाठीं फरायाचं आनलं ? " आणि तिनं आणलेल्या फराळाच्या पुड्यांचीं नांवें जन्याला मोठ्या चढ्या स्वरांत सांगूं लागली.

पण दुसऱ्याच तंद्रींतला जन्या म्हणाला,

" वासाचं तेलई आनलं ओ मा—जन्याच्या घरीं..."

" आनूं आनलं त..."

जन्याला वळवतांना ती म्हणाली, " त्याच्यांत मोठं आहे—खोबऱ्याचं तेल लावलं काय आन् वासाचं लावलं काय-दोनई तेलच आये का नाई ? "

पण यावर उत्तर देण्याऐवजी जन्या पुन्हां आठवून घाईनं म्हणाला, " आन् का नाई ओ मा—जान्याच्या बापानं त्याच्यासाठीं नुसत कुडतं नाई आनलं..."

आतां मात्र रुक्मा त्याला वळवण्याचं विसरून म्हणाली,

" मंग काय आन्लंत ? "

" चड्डीई आन्ली. "

तो घाईनं सांगूं लागला,

" चांगली साडेचार रुपयांची आये कानं...अस्सी मस्त आये ओ मा ये चड्डी तुले काय सांगूं..."

" काय सांगतं बाबा ! "

रुक्मा आतां एकदम स्वतःला विसरून म्हणाली,

" आनूं आनलीत—त्या विचाऱ्याले बाप आये मून त्यानं आनली. तुहं त करमं असं दळिद्र आहे लेका—त्याले मी तरी काय करूं आन् तूं तरी काय करसीन सांग—"

आणि पुढं न बोलवल्यानं रुक्मानं जन्याला जरा आणखी पोटाशीं ओढून घेतलं अन् त्याच्या सदऱ्याविना 'उघड्या' पाठी-वरून हात कुरवाळूं लागली. बारंबार.

• • •

माधव सातवळेकर

# माझ्या कलेची श्रद्धा



श्री. माधव सातवळेकर यांचे "सेल्फ पोर्ट्रेट"

माझी अशी समजूत आहे कीं, रंगांच्या माध्यमांतून स्वतःचें हृद्गत व्यक्त करणाऱ्या कलावंताच्या श्रद्धेचीं मूलभूत तत्त्वें सारखींच असतात. स्वतःचें दर्शन घडविण्यासाठीं कलेला पुढील निकष असणें अतिशय महत्त्वाचें असतें.

(१) अभिव्यक्तीचा प्रामाणिकपणा अथवा सरलता,
(२) भावनिक अस्तित्व, (आशय)
(३) भावनांचें दर्शन घडविण्याची शक्ति; व
(४) रंगाकृतीचे चित्र गुण !

आदिवासी आफ्रिकन कलेपासून तों थेट नवकलेंतील आजतागायत वादापर्यंत, सर्व महान कला, कलाकाराला त्याच्या सरळ अन् प्रामाणिक कल्पनांतून स्फुरुन अभिव्यक्त झालेली आहे. जें प्रामाणिक नाहीं, आणि जें कुणाच्या उसनवारीतून अथवा प्रभावांतून उदित झालें तें त्या महानतेच्या जवळपासहि पोहोंचणार नाही. मुलें अथवा आदिवासी जनता यांच्या कलाकृती या विधानाची सत्यता पटवितात. इतरेजनांच्या दडपणानें डळमळीत न झालेल्या त्यांच्या अंतरांतील जें बरोबर आहे तेंच टिपण्याचा तो सहज उद्रेक असतो. आणि म्हणूनच आपल्याला बाल-कांच्या व आदिवासींच्या कलेंत अभिव्यक्तीचा ' प्रामाणिकपणा आढळतो ! त्या आदिकलेच्या अंतर्गत साधेपणाची उथळपणें उचल करणें व तिला आपली प्रामाणिक अभिव्यक्ति म्हणणें हें निरुपयोगीच ठरेल !

उचंबळणाऱ्या भावनांची साथ नसेल तर काव्य म्हणजे निव्वळ पद्यांत लिहिलेला गद्य मजकूरच ठरेल ! तद्वतच आशयहीन चित्रकृती म्हणजे रंग अन् कापड यांचा चेतनाहीन तुकडाच ठरेल. भावना म्हणजे केवळ तर्कहीन असा भावनांचा गोंधळ नव्हे. तर एकाद्या वस्तूच्या अगर कल्पनेच्या परिचयांतून कलावंताला स्फुर-लेल्या विचारांच्या अभिव्यक्तीच्या प्रयत्नाची सृजनशील प्रक्रिया मला येथें अभिप्रेत आहे.

दुर्दैवानें आजच्या बुद्धिवादी जगांत, भावनात्मक वा काव्यमय अभिव्यक्तीचा फारसा आदर केला जात नाही. असें म्हटलें जातें कीं चित्रानें गोष्ट सांगतां कामा नये, कारण मग तें उदाहरण होतें, चित्राला काव्यमय कल्पना असूं नये, कारण मग त्यावर भावनात्मकतेचा शिक्का मारला जातो. एकदा गोजिरा चेहरा अथवा साजिरें निसर्ग-दृश्य रंगवणें म्हणजे तें भावनांना आवाहन ठरतें म्हणून तो अपराधच म्हटला जातो ! !

येथें हें नमूद करून ठेवलें पाहिजे कीं मी नवकलेचा मोठा चाहता आहे. जुन्या कृतीं-प्रमाणेंच अनेक नवीन कलाकृतींनी माझ्या चित्तवृत्तींना स्पर्श केलेला आहे ! ब्राक, मातिस (Matiss) किंवा पिकॅसो हे मला अनेक कारणांनीं अतिशय स्फूर्तिदायक वाटतात. कलावन्ताच्या स्वतंत्र व्यक्तिमत्वाचें चांगलें व सत्यदर्शन ज्यांत आहे अशी कलाकृती, मग ती कुठल्याही पद्धतीची असली तरी मला आदर्शच वाटते. अप्रामाणिकतेची आणि असत्याची भलावण करणारें मग तें नव्या-जुन्या कुठल्याहि प्रकारचें असो निषेधार्ह ठरवून धिक्कारलेंच पाहिजे. परन्तु आपल्या तथाकथित आधुनिकांचा, त्यांच्या व्यतिरिक्त





अनुक्रमणिका

अन्य सर्व तें त्याज्य समजण्याचा दृष्टिकोन दुसऱ्या दिशेनें विचारप्रवण करतो.

रंगचित्र म्हणजे का केवळ आकृति अन् रंग याचें गणिती कूट आहे? वेगवेगळाले रंग आणि आकृति यांची भूमितींतील प्रमेयां-सारखी का जोडणी करून ती सोडवायची आहे? अशा वस्तूला रंगचित्र तरी म्हणतां येईल काय? पहाणाऱ्याला तें कलावन्ताच्या विचारांचें सम्यग् दर्शन घडवील काय? मला खरोखरच असें वाटतें कीं रंग आणि आकृति यांचा समन्वय साधणारें चित्र केवळ कारा-गिरी अथवा शोभेची वस्तू होईल, तें उत्तम रंगचित्र ठरणार नाहीं. मॉड्रिनच्या भूमितीं-तील आकृती केवळ शोभा म्हणून सुन्दर आहेत, पण त्याहून अधिक नाहींत. आजच्या जगांतील वास्तुकला व लाकूडकामकलेबरोबर शोभेच्या वस्तु म्हणून त्या ठेवल्या जातील. परिश्रमपूर्वक अथवा तथाकथित बुद्धिजन्य अशी सर्व चित्रें त्यांत भावनिक आशय नस-ल्यानें, केवळ शोभेच्या छानदार वस्तू झाल्या आहेत. कलावन्ताच्या बौद्धिक कुवतीचा परि-पाक म्हणजे अचेतन कला होय! त्याच परि-स्थितींतील वाङ्मयीन कृतींशीं तुलना केल्यास अशीं चित्रें म्हणजे फारतर तत्वज्ञानाचे निबंध ठरतील, परंतु कांहीं केल्या त्यांत एकाद्या अभिजात कवितेचें सौन्दर्य आणि मर्म येऊं शकणार नाहीं. तत्वज्ञानावरील एकाद्या विचारप्रवर्तक भाष्यांप्रमाणें तें रंग आणि आकृति यांचे यथायोग्य तयार केलेलें उदा-हरण होईल. उत्स्फूर्त कृतींत भावना सहजगो-चर असते! उत्स्फूर्ततेमुळें एकाद्या कल्पनेच्या भावनिक आशयाचा ताजेपणा चिरंतन राहतो. वॅन्गोग यांच्या चित्रांवरून हें सहज कळण्यासारखें आहे. रसिकावरील त्याचा प्रभाव इतका विलक्षण असतो, कीं प्रेक्षक चित्रविषयासकट सर्व कांहीं विसरतो आणि चित्रकाराच्या भावनेशीं एकरूप होतो.

असें सांगण्यांत येतें, कीं अचेतन कला-सुद्धां उत्स्फूर्त असूं शकते. उदाहरणार्थ, एकादा नामवंत अमेरिकन कलाकार जमिनीवर मोठा चित्रफलक पसरून त्यावर वेगवेगळ्या रंगांचीं भांडी उपडीं करतो, आणि त्याला थोडेसें अखेरचे हात मारतो कीं उत्कृष्ट कलाकृती (?) तयार होते!

एका प्रख्यात टीकाकारानें म्हटलें आहे कीं "कलाकृतीमध्यें आंतरिक आणि बाह्य अशीं दोन तत्वें असतात." कलावंताच्या आत्म्यातून प्रकट होणारें तें भावनांचें आंतरिक तत्त्व होय. या भावनेंत प्रेक्षकाच्या हृदयांत तीच भावना चेतविण्याचें सामर्थ्य असतें. या दोनही भावना सारख्याच असतात आणि तितक्यापुरती ती कलाकृती यशस्वी झालेली असते. या दृष्टीनें पाहतां चित्र आणि गीत हीं सारखींच आहेत. दोन्हीही दर्शन घडवितात.

आपल्या भावना आणि विचार प्रेक्षकाला यथातथ्य कळविण्याची कलावंताची शक्ति हा चित्रविषयक तिसरा महत्त्वाचा मुद्दा होय. एकादा चित्रकार जेव्हां म्हणतो कीं "मी माझ्याचसाठीं चित्र रंगवतों व इतरांना तें समजलें नाहीं अथवा आवडलें नाहीं याची मी खंत बाळगत नाहीं, तेव्हां माझा विश्वास बसत नाहीं. येथें, तो स्वतःला तर फसवितोच आणि स्वतःच्या भावना रसिकापर्यंत पोहोंच-विण्याच्या असमर्थतेपासून स्वतःला आसरा शोधतो. एकाद्या पोरालासुद्धां त्याच्या रेघो-ट्यांचा अर्थ लागावा अशी अपेक्षा असते!

संगीत, काव्य अथवा चित्रकला हीं सर्व कलावंताची आपले विचार आणि भावना यांचें दर्शन घडविण्यासाठीं केलेली अभिव्यक्ति असते. आपलें गीत लोकांना कळलें, व आवडलें असें ऐकल्याशिवाय त्याच्या आनंदाची परिपूर्ति होत नाहीं. तीच गोष्ट चित्रकाराची! जेव्हां एकाद्या कलावन्ताला जनतेच्या कळण्या आवडण्याची काळजी वाटत नाहीं, तेव्हां त्याला तें जमत नसतें हेंच खरें. जर तो खरोखरीच स्वतः पुरताच चित्र काढतो तर मग त्याला त्याचें जनतेंत प्रदर्शन करण्याची काय आवश्यकता आहे? एकदां चित्रकृती पूर्ण झाली, आणि रंगविण्याचा आनन्द त्याला मिळाला कीं तें चित्र त्यानें गुदामांत ठेवून द्यावें अथवा नष्ट करावें, कारण कलावन्ताला आनन्द देण्याचें त्याचें कार्य पूर्ण झालेलें असतें. पण असें कधीं घडत नाहीं. भावनांचें दर्शन आणि रसग्रहण या चित्राच्या अंतर्भूत गोष्टी आहेत. मी असें म्हणत नाहीं कीं चित्र रंगवितांना त्याच्या मनांत जनतेला कांहीं संदेश द्यावा असें असतें. परन्तु त्याच्या भावनांचें जेव्हां इतरांना दर्शन घडतें तेव्हां त्याला आनन्द होतो याविषयीं मला संशय वाटत नाहीं!

आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ चित्रकलेविषयीं वादाचा बराच धुरळा उडालेला आहे. दोन्ही प्रकारांना स्वतःचे असे अंगभूत गुण आहेत, आणि ते तसेच पाहिले जावेत. रेंब्राँ आणि एकाद्या ठोकळे-बाज अथवा अतिवास्तववादी चित्रकाराची कलाकृती जर एकाच फूटपट्टीनें मोजली गेली तर त्याला कांहीं अर्थच उरणार नाहीं. वस्तूकडे पाहाण्याचे हे वेगवेगळे दृष्टिकोन आहेत. कुठलाही वरचढ वा कमजोर नाहीं.

नृत्यामध्यें कथ्थक, भारत-नाट्यम, कथा-कली असे वेगवेगळे प्रकार आहेत. या सर्व पद्धति नर्तकाच्या भावनांना अभिव्यक्त करण्याचा प्रयत्न करतात. जोपर्यंत नृत्य नीट प्रकारें केलें जात आहे तोपर्यंत अमुक पद्धति चांगली वा सदोष असें आपण म्हणूं शकत नाहीं. असें जर आहे तर चित्रकलेंतच वेगवेगळे प्रकार कां नसावेत? केवळ युरोपांत आधुनिक नव कला प्रचारांत आहे म्हणून आपल्याहि कलावंतांनीं आणि विद्यार्थ्यांनी न समजतां ती अनुसरलीच पाहिजे काय? युरोपांत आहे तसेंच सामाजिक जीवन, वातावरण व ऐतिहासिक पार्श्वभूमि आपल्या-कडे आहे काय? आपली स्थिती अगदी निराळी आहे. आपला देश हा प्रामुख्येंकरून शहरें आणि खेडीं यांच्या संमिश्रतेचा असून औद्योगिक शहरांचा नाहीं. येथें शांति आणि सरळ जीवन यांचें अधिराज्य आहे. अजून आपण, पायाला भिंगरी लागलेल्या आणि विश्रामहीन अशा विकट अवस्थेंत आलेलों नाहींत. आधुनिक

नव्या वर्षाचे नवे बेत : घरमालक—



या वर्षी 'पागडी' घेणार नाहीं!






पाश्चात्य चित्रकलेंत हा गोंधळ आणि विश्राम-हीनता दिसतें हें साहजिक आहे. परंतु आमच्या शांत खेड्यांतून राहणारा कलावंत जेव्हां ही भावनिक अस्वस्थता चित्रांतून दाखवितो, तेव्हां मला हंसूं आल्यावाचून राहात नाहीं! आमच्या खेड्यांतील शांत आणि गंमीर वातावरण हा आमच्या जीवनाचा आणि संस्कृतीचा गाभा आहे.

चांगली कलाकृति ही शांतिदायक आणि सुखकारक असावी. आपल्या संगीतांत श्रोत्यांवर हा परिणाम घडविला जातो. त्यांत आवेग नसल्यामुळें एखाद्या पाश्चात्याला तें अवघड आणि कष्टदायक वाटत असल्यास नवल नाहीं.

दुसरी गोष्ट अशी कीं आमची मानसिक वाढ अगदीं निराळ्या प्रकारची आहे, आमची जीवनघडण निराळी आहे, आमचें तत्त्वज्ञान निराळें आहे आणि आमची शारिरीक स्थितीहि निराळीच आहे. म्हणून पॅरिसचें सर्वांगीण अनुकरण करण्याची पद्धति आमच्या मनोवृत्तीला मानवण्याजोगी नाहीं.

थोडक्यांत, कॅंडिन्सिम म्हणतो त्याप्रमाणें, "प्रत्येक कलावंतात, तो निर्मितीक्षम असल्यामुळें अभिव्यक्तीची गरज असतेच. आणि प्रत्येक कलावंत हा काळाचें अपत्य असल्यामुळें, ज्या काळांत आणि ज्या विशिष्ट देशांत तो असतो त्या काळाचें दर्शन अपरिहार्यदणें घडवीत असतो!"

मला जर आपल्या लोकांचें जीवन जसें दिसतें तसें रंगवावेसें वाटलें तर तसें मी कां करूं नये? तें कोन आणि त्रिकोन अथवा पोरकट रेघोट्या ओढून कसें जमणार? मला जर एकादें शांत जुनाट खेडें जसें एकाद्या हिवाळ्यांतील सकाळीं दिसतें तसें चितारावेसें वाटलें तर मी माझ्या बालपणच्या सर्व सुखद आठवणी काढून तसें कां करूं नये? आपल्या पवित्र आणि शान्त सौन्दर्यानें जगाचा विसर पाडावयास लावणारा कांचनगंगा शिखरावरचा तेजस्वी सूर्योदय अजून मला आठवतो. त्या शांतीचा आणि सौन्दर्याचा साक्षात्कार जर मला माझ्या रंगांतून व्यक्त आला तर मला आणखी कांहींहि नको!!

तुम्ही मला वास्तवतावादी म्हणा, भावनावादी म्हणा अथवा अजिवात कलावंत म्हणूंच नका, मी कुठली पद्धति अनुसरतों आहे, काळजी न करतां माझ्या भावना प्रामाणिकपणें माझ्या चित्रांतून व्यक्त करण्याचा प्रयत्न मीं करीतों.

तुम्हां सर्वांना रेंब्रॅंचे व वेलास्केअचे पोर्ट्रेट्स व होनेमा, कान्स्टेबल, टर्नर यांचीं निसर्गदृश्यें आवडतात; परंतु एकाद्या चित्रकारानें तसें रंगविल्यास ती पुस्तकी आणि जुनाट कला ठरते. त्यांत नवीन कांहींच नाहीं असें म्हटलें जातें. आणि जो ह्या तथाकथित नवकलेचा आश्रय करतो—जी कला इथें नवीन असली तरी युरोपांत पन्नास वर्षांपूर्वीच अनुसरली गेली होती—तो भारतीय नवकलेचा नोटा उद्‌गाता ठरतो! ज्यांना तसें व्हायचें आहे त्यांच्याबद्दल माझें कांहींच म्हणणें नाहीं. मला सांगावयाचें आहे तें हेंच कीं प्रत्येकानें हुलाहुप नृत्य करावें वा मुक्तछंदांत काव्यरचना करावी असा कृपया आग्रह धरूं नका. कलावंताच्या स्वतंत्र व्यक्तिमत्वाला वाव द्या, त्याला अभिव्यक्तीबाबत प्रामाणिकपणा बाळगूं द्या! तो कोणत्या पद्धतीचें चित्रकाम करतो हें महत्वाचें नसून तें कसें करतो हेंच महत्वाचें आहे.

परस्परांचें व्यक्तिमत्व आदरानें पाहाण्यास आणि परस्परांचे दृष्टिकोन समजून घेण्यास आपण शिकूं या! यानेंच झालें तर आपल्या देशांतील कलेची वाढ होईल आणि आपण एकमेकांस समजूं शकूं!

अनुवाद : **उमाकांत कीर**

---





अनुक्रमणिका




# प्रमिला

चंद्रसेन

कलकत्त्यासारख्या मोठ्या शहरांत पहाटे पांच वाजल्यापासूनच रस्तोरस्तीं माणसांची वर्दळ सुरू होते. दूधवाले, पाववाले आणि घरगडी याची गडबड सुरू होते. त्यामुळें १९ फेब्रुवारी १९५७ रोजीं सकाळीं १५० कालीघाट रोडवरील एका ब्लॉकचा दरवाजा अर्धवट उघडा असलेला पाहूनहि त्या घरांत काम करणाऱ्या मोलकरणीला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. शिवाय मालकीणीचा धंदा वेदयेचा त्यामुळें रात्रौ जागरण—आणि कुणीहि यावं आणि कुणीहि जावं--अशी परिस्थिति. त्यामुळं पहाटे पांच वाजतां आपल्या मालकीणीच्या खोलीचा दरवाजा उघडा असलेला पाहून मोलकरीण निःशंकपणें दरवाजा लोटून आंत शिरली.

आंत पाऊल टाकलें तों काय ! कॉटवर आपल्या मालकीणीचं प्रेत पडलेलं आणि खोलींतलं सारं सामान अस्ताव्यस्त झालेलं.

भयानें तिनें मोठ्यानें किंकाळी फोडली आणि आजूबाजूच्या शेजाऱ्यांना उठवलं कुणीतरी भवानीपूर पोलिसचौकीला बातमी दिली. पोलीस लागलीच तेथें आले आणि त्यांनीं कसून तपासणी केली. एकंदर खोलीच्या अस्ताव्यस्त स्वरूपावरून प्रमिलेचा खून संशयास्पद स्वरूपांत झालेला आहे अशी त्यांची खात्री पटली. कालच्या रात्रीं जंगी पार्टी झाली असावी असं इतस्ततः पडलेल्या बाटल्या, ग्लासं, खाण्याचे पदार्थ यावरून दिसत होतं. प्रमिलेच्या मृत शरीरावरून हें स्पष्ट दिसत होतं कीं तिचा मृत्यू विषप्रयोगानें झालेला आहे. जवळच एक ग्लास आणि देशी दारूची बाटली होती. त्यांवर बोटांचे ठसे होतेच. दांडीवर एक धोतर पडलं होतं. थोड्याच वेळांत प्रेत शीतगृहांत पाठविण्यांत आलं आणि तेथें डॉक्टरांनीं तपासणी करून निर्णय दिला कीं प्रमिला विषप्रयोगानें मरण पावली आहे.

पोलिसांनी प्रमिलेच्या खोलीची बारकाईनें

तपासणी केली. घरांतील आणि आजूबाजूच्या लोकांचे जबाब घेतले. या जबाबावरून असें निष्पन्न झालें कीं वेश्येच्या धंद्यांत प्रमिलेची मिळकत चांगली होती आणि ती स्वभावानें आनंदी व खिलाडू असल्यामुळें तिला शत्रूहि नव्हते. आपल्याकडे येणाऱ्या गिऱ्हाईकांना खूष ठेवण्याची कला तिला चांगलीच अवगत होती आणि त्यासाठीं वाटेल तें करायला ती मागेंपुढें पाहात नसे. प्रमिलेजवळ दागदागिने असूनहि त्यावेळीं मात्र तिच्या अंगावर एकहि दागिना आढळला नाहीं. पोलिसांनीं मोलकरणीजवळ चौकशी केली तर असं कळलं कीं प्रमिलेजवळ सोन्याचा हार, सोन्याचे डूल, चार बांगड्या आणि एक अंगठी एवढे दागिने होते. घरमालकीणीनेहि या माहितीला दुजोरा दिला. शिवाय आपल्या गिऱ्हाईकांत प्रमिला फारच लोकप्रिय असल्यामुळें तिला भेटीदाखलहि पुष्कळ वस्तु मिळत. या दागिन्यांपैकीं एकहि दागिना खोलींत सांपडला नाहीं. त्यामुळें चोरीच्या हेतूनें हा खून झाला असावा असा पोलिसांनीं निष्कर्ष काढला.

आतां पोलिसांचं पुढचं काम गुन्ह्याचा तपास करणं. त्यांना माहिती मिळाली कीं कालच्या रात्रीं तिच्याकडे दोन इसम आले होते आणि ते रात्रभर राहिले. पण हे इसम कोण होते याबद्दल निश्चित माहिती पोलिसांना कुणीच देऊं शकलें नाहीं. मोलकरणीनेंहि सांगितलं कीं काल दोन इसमांना आपण घरांत घेतल. तिलाहि त्यांचीं नांवं अगर नीटसं वर्णन करतां आलं नाहीं. घरमालकीणीनं सांगितलं कीं आपण नेहमींप्रमाणं खालीं एक फेरी टाकली तर प्रमिलेच्या खोलींत दोन इसम बसलेले आणि हास्यविनोदाच्या गप्पा रंगांत आल्या होत्या असं दिसलं. पण तिलाहि त्या इसमांचं वर्णन करतां आलं नाहीं.

यामुळं पोलिस इन्स्पेक्टरची मति गुंग झाली. गुन्हा ताजा असतांनाच त्याचे धागेदोरे उलगडले पाहिजेत नाहींतर गुन्हेगार निसटून जायला त्याला अवधि सांपडतो. शेजाऱ्यापाजाऱ्यांचा जबाब निरुपयोगी ठरल्यामुळें त्यांना आतां प्रमिलेच्या खोलींत सांपडलेल्या पुराव्यावर विसंबून राहाणं भाग होतं. दारुची बाटली आणि ग्लास यावरील चोरांचे ठसे पोलिसांच्या रेकॉर्डमध्यें सांपडूं शकले नाहींत. गुन्हेगारांनीं खोलींतील शांडीवरे टाकलेल्या धोतराची त्यांनी तपासणी केली. त्या धोतरावर एक लांब केस अडकलेला आढळला. तो केस प्रमिलेचा नव्हता हें निश्चित. त्यामुळें त्या दोन इसमांपैकीं एक इसमाचे डोक्याचे केस लांब असले पाहिजेत असा पोलिसांनीं निष्कर्ष काढला. शिवाय धोतरावर लाँड्रीच्या खुणा होत्याच. त्यामुळें पोलिसांनीं लाँड्रीचा तपास करण्याचं ठरविलं. तपास करतां करतां अखेर कलकत्त्याच्या स्कॉटलेनमध्यें ती लाँड्री मिळाली. लाँड्रीच्या बिल्बुकांत तें धोतर जी. दास ४३ बैथकाना रोड असा पत्ता होता. त्या बिलांत धोतराबरोबर एक टॉवेल, हातरुमाल, चड्डी आणि एक पँट धुवायला दिली होती. पोलिसांनीं ४३ बैथकाना रोड वरील घराचा तपास केला तर तेथें जी. दास नांवाचा माणूसच राहात नाहीं असें कळलें. याचा अर्थ असा कीं गिऱ्हाइकानें लाँड्रीला खोटा पत्ता दिला होता. पण तो याच लाँड्रींत कपडे देत असतो आणि अजूनहि त्याचे कपडे लाँड्रींत पडून

आहेत ते नेण्यासाठीं परत तो केव्हांतरी येणार, अशी पोलिसांची खात्री झाली. पोलिसांनीं त्यासाठीं बरेच दिवस पाळत ठेवली पण ते कपडे न्यायला कुणीच आलं नाहीं. धोतरावर आणखी एका लॉंड्रीच्या खुणा होत्या. त्या लॉंड्रीचा तपास केल्यावर असं आढळलं कीं तेथें जी. दास २३ प्रेमचंद बोराल स्ट्रीट असा पत्ता दिला आहे. या घराचा पोलिसांनी पत्ता काढला तर तो एक कुंटणखाना निघाला. पण तेथें जी. दास नामक इसमाचा कांहीं पत्ता लागेना. मात्र एवढंच कळलं कीं तो इसम जवळच्या एका कुंटणखान्यांत राहिला होता पण आतां तो तेथें नव्हता. एकूण लॉंड्रीच्या खुणा निरुपयोगी ठरल्या पण जी. दास नांवाच्या माणसाचें बाह्यवर्णन तरी पोलिसांना मिळालें.

पण पोलिसांचं नशीब बलवत्तर होतं. या घटनेनंतर एक महिन्यानंच १० सोनागच्ची लेन या कुंटणखान्यांत एका वेश्येचा खून झाला अन् तोहि याच पद्धतीनें. हा भाग म्हणजे शहराची उत्तर बाजू तर मागील खून शहराच्या दक्षिण बाजूस झाला होता. पण यामुळें एक गोष्ट सिद्ध झाली अन् ती ही कीं खुनी इसमाचा कुंटणखान्याशींच जास्त संबंध आहे. त्यामुळें पोलिसांनीं शहरांतील सर्व कुंटणखान्यांवर सक्त नजर ठेवली आणि त्याचा योग्य तो उपयोग होऊन १९ मार्च १९५७ रोजीं सेट बागान लेन मधील एका कुंटणखान्यांत पोलिसांनीं दोन संशयित इसमांना अटक केली. दुर्गा बाला दासी नांवाच्या वेश्येच्या खोलींत दोघेजण सांपडले. संशयितांपैकीं एकानें आपलें नांव गोपेश्वरदास असें सांगितलें व दुसऱ्यानें आपलें नांव धीरेंद्रनाथ सेन आहे असें सांगितलें. या दोघांची चेहरेपट्टी आणि इतर वर्णन प्रमिलेच्या खुनी इसमांच्या वर्णनाशीं बरोबर जुळणारी होतीं. पोलिसांनीं दुर्गाबालाच्या खोलीची कसून झडती घेतली तेव्हां त्या झडतींत त्यांना दोन फोटोफ्रेमगागें विषाची पांढरी पावडर असलेल्या दोन पुड्या सांपडल्या. शिवाय एक चड्डी, हात रुमाल आणि शर्ट सांपडला. प्रमिलेच्या खोलींत सांपडलेल्या धोतरांवर ज्या लान्ड्रीच्या खुणा होत्या त्या खुणा या कपड्यांवरही होत्या. लॉन्ड्री रिसिटमधील फक्त टॉवेल मात्र सांपडला नाहीं.

सुरवातीला दोघांनीं आपला गुन्ह्याशीं कांहींच संबंध नसल्याचें छातीठोकपणें सांगितलें. पण पोलिसांनीं व्यवस्थित छेडल्यावर आणि त्यांत विरुद्ध पुरावा किती बळकट आहे याची कल्पना दिल्यावर त्यांनी कबूली दिली कीं त्या रात्रीं प्रमिलेच्या खोलीवर आपण गेलों होतों.

"तुम्ही दोघे कोणत्या हेतूनें तिच्याकडे गेलांत ?" पोलिसांनीं विचारलें.

"आम्ही साफ कडक झालों होतों. खिशांत एक दमडी उरली नव्हती शिवाय प्रमिलेकडे खूप दागिने आहेत हें आम्हांला माहीत होतंच. आणि हे दागिने आम्हाला उपयोगी पडतील अशी आमची खात्री होती. प्रमिलेला दारू प्यायचा नाद होता त्याचा आम्ही फायदा घ्यायचं ठरवलं. आम्ही एका मित्राकडून पोटॅशियम सायनाईड घेतलं आणि १८ तारखेला रात्रीं तिच्याकडे गेलों. आमच्या दोघांच्या हातांत दारूच्या बाटल्या पाहून तिनं आमचं प्रेमानं स्वागत केलं. थोड्याशा गप्पा मारल्यावर आम्ही पत्ते खेळायला बसलों, आणि बाटल्या उघडल्या–ग्लासं मागवलीं. मात्र आम्ही दोघांनीं दारूला स्पर्श न करतां प्रमिलेला सारखा आग्रह करीत होतो. तिचं लक्ष नाहीं असं पाहून तिच्या ग्लासांत आम्ही सायनाईड टाकलं आणि तो ग्लास तिला प्यायला दिला. पितांक्षणींच ती बिछान्यावर कोसळली. लागलीच तिचे दागिने आम्ही गोळा केले आणि दरवाजा लावून पळ काढला."

केमिकल ॲनलाझरनें आपल्या तपासणींत प्रमिलेचा मृत्यु सायनाईडनें झाला आहे हें मत व्यक्त केलें. शिवाय एका दारुच्या ग्लासांत आणि बिछान्यावरील सांडलेल्या थोड्याशा दारुंत सायनाईड आहे हें सिद्ध झालें. दुर्गाबाला दासीच्या खोलींत सांपडलेल्या पुड्या सायनाईडच्या होत्या हेंहि सिद्ध झालें.

प्रमिलेच्या खोलींत सांपडलेल्या धोतरावरचा लांब केस हा दुर्गादासच्या डोकींवरील केसांपैकींच हें सिद्ध झालें. प्रमिलेच्या खोलींतील एका ग्लासावर असलेले बोटांचे ठसे धीरेंद्रदासाच्या बोटांच्या ठशांशी जुळते निघाले.

याशिवाय नोलकरीण आणि शेजारीपाजारी यांनीं प्रमिलेकडे आलेले रात्रीचे पाहुणे हेच असें ओळखलें. लॉंड्रीवाल्यानेंहि कपड्याच्या मालकांची ओळख पटवली. याशिवाय ज्या सोनाराकडे दागिने विकायला दिले त्या सोनाराला या दोघांनीं आपलीं नांवें खोटी सांगितली होती पण त्याच्याकडील पावत्यावरील सह्या आणि इतर मजकूर हा दासच्याच हातचा आहे हें हस्ताक्षरतज्ञानें मान्य केलें.

हा सर्व पुरावा गोळा करून पोलिसांनीं फिर्याद दाखल केली. पण सोनागच्ची लेनमध्यें झालेल्या खुनाबाबत पोलिसांना निर्णायक पुरावा दाखल करतां आला नाहीं आणि त्यामुळें ते त्या गुन्ह्यांतून निर्दोष सुटले. सोनागच्ची लेनमध्यें त्यांनीं जे दागिने पळविले होते ते सर्व खोटें होते ती वेश्या गरीब पण बाहेरचा डामडौल आणि भपका दाखविण्यासाठीं ती बिचारी खोटे दागिने वापरीत होती. अर्थात् या दोन गुन्हेगारांनीं आपल्या क्षुल्लक नडीसाठीं एका गरीब पोरीची हत्या करायला मागें पुढें पाहिलें नाहीं.

मात्र प्रमिलेच्या खुनाबाबत त्यांना शिक्षा झाली. ज्युरींनी एकमतानें दोघां आरोपींना शिक्षा ठोठावली. निकालपत्रांत शेवटीं न्यायाधीश म्हणतात—या दोन गुन्हेगारांची अधोगति एवढी कीं आपलें लाजिरवाणें जीवन जगण्यासाठीं मोठ्या कष्टानें गोळा केलेल्या बिचाऱ्या वेश्येच्या दागिन्यावर यांची दृष्टि जावी ! अशा गुन्ह्याला जास्तींत जास्त कडक शिक्षाच देणें योग्य होईल. परंतु आरोपींनीं आपलें उर्वरित आयुष्य तरी चांगल्या तऱ्हेनें घालवावें यासाठीं या दोन्ही आरोपींना मी जन्मठेपेची शिक्षा देत आहे.

• • •









# परमेश्वर आणि मी

पु. य. देशपांडे

हजारों वर्षे मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचे दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें.

**— आमची प्रश्नपत्रिका —**

१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का ? असेल तर कां ? नसेल तर कां नाहीं ?

२—आपला धर्मावर विश्वास आहे का ? असेल वा नसेल ! तर काय म्हणून ?

३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय ? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय ?

४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कान्वयें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय ?

५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधीं आणखी कांहीं सांगूं शकाल का ?

## पु. य. देशपांडे

मराठींतील एक नामवंत लेखक. बंधनाच्या पलीकडे या त्यांच्या १९२७ सालीं प्रसिद्ध झालेल्या कादंबरीनें महाराष्ट्रांत फार खळबळ उडवून दिली होती. सुकलेलें फूल ( १९३० ) व सदाफुली या काव्यमय कादंबऱ्यांनाहि चांगलीच लोकप्रियता मिळाली. साम्यवादापासून पु. य. देशपांडे पुढें गांधीवादाकडे वळले आणि आतां त्यांचें सारे लक्ष आध्यात्मचिंतनाकडे.

उ. १—परमेश्वर आहे, हें मला पटलेलें आहे. पण 'परमेश्वरावर विश्वास वा श्रद्धा' ही भाषा निर्बुद्धतेला पोषक ठरलेली आहे. कारण विश्वास वा श्रद्धा ही बुद्धि मंद, बंद वा बद्ध करून टाकणारी असते. मंद, बंद वा बद्ध बुद्धीला ईश्वराचा साक्षात्कार होणें अशक्य आहे. कारण नित्य मुक्त व विशुद्ध बुद्धीचा अंतिम व अचल परिपाक म्हणजेच ईश्वरत्व, अशी माझी अनुभवानें व अभ्यासानें बनलेली धारणा आहे.

हिरोशिमोवर ॲटमबॉंब टाकणारेहि परमेश्वरावर विश्वास आहे, असें म्हणूं शकतात; असंख्य गरीबांची योजनाबद्ध व निर्घृण पिळवणूक करणारे सत्तापिसाट व संपत्तिपिसाटहि ईश्वरश्रद्धेची भाषा बोलूं शकतात; आणि पंढरीला पायीं भक्तिभावानें वारी करणारा व कोणालाहि न दुखविणारा गरीब वारकरीहि परमेश्वरावर विश्वास आहे, असेंच म्हणतो. इतक्या परस्परविरुद्ध वृत्तींना व कृतींना सारखेच पोषक होणारे शब्द न वापरणेंच बरें. परमेश्वर हा विश्वास वा श्रद्धा यांचा विषय नसून केवळ साक्षीवृत्तींतून उदयास येणाऱ्या सत्-बुद्धीच्या साहाय्यानें प्रत्यक्ष जाणवणारा असा तो आहे.

परमेश्वरावर व धर्मावर विश्वास व अचल श्रद्धा आहे, असें म्हणणाऱ्यांनीच जगांत इतकें दुःख, दारिद्र्य, असत्य, अन्याय, हिंसा, पिळणूक व पापाचरण पसरविलें आहे कीं, त्यामुळें 'परमेश्वरावर विश्वास वा श्रद्धा आहे' असें म्हणण्यास माझी जीभ नेहमीं कचरते. 'परमेश्वरावर विश्वास वा श्रद्धा'—या भाषेंत परमेश्वरापेक्षा 'विश्वास व श्रद्धा' यांनाच माहात्म्य प्राप्त होतें आणि ईश्वर बिचारा बाजूलाच राहतो ! एवढेंच नव्हे, तर या विश्वासाच्या व श्रद्धेच्या वेदीवर परमेश्वर पार चिरडून टाकला जातो ! !

परमेश्वराच्या नांवावर जबरीच्या धर्मान्तराची मोहीम करणारे इस्लाम व खिश्चानिटी या सारखे धर्म आणि विश्वास व श्रद्धा यांच्या आहारीं जाणारे व विरोधकांना नेस्तनाबूत करूं इच्छिणारे सर्व पुरातन वा आधुनिक कम्युनिझम सारखे मंद व बंद बुद्धीचे 'वाद' यांचा परमेश्वराशी व मानवतेशीं कसलाहि संबंध नाहीं.

जेथें विश्वास वा श्रद्धा यांनाच माहात्म्य प्राप्त होतें आणि अश्रद्धाला शत्रु लेखण्यांत येतें, तेथें परमेश्वराची भाषा कितीहि असली तरी परमेश्वराचें अस्तित्व तेथें नसतें. आणि जेथें परमेश्वराची भाषा मुळींच नसते, पण स्वातंत्र्य, परस्परादर, आपल्यापासून दुसऱ्याला दुःख होणार नाहीं याची जाणीव, सत्य, अहिंसा, न्याय, दया, क्षमा व शांति स्वभावतः असते तेथें ईश्वराची वसती असते. पण परमेश्वराचें नांव न घेतांहि हें सर्व असण्याला आपल्याला आपल्या अल्पज्ञतेची अखंड जाणीव असावी लागते आणि अहंकार-अभिमान-अभिनिवेशशून्य अशा विनयशील ज्ञानलालसेची ज्योत









अनुक्रमणिका

अंतःकरणांत अखंड तेवत असावी लागते. एवढेंच नव्हे, तर मंद व क्षुद्र बुद्धीमुळें निर्माण होणारी काजळी या ज्योतीला घेरून टाकणार नाहीं, अशी अखंड सावधानताहि असावी लागते. हीच ईश्वराच्या अस्तित्वाची खूण आहे, असें मी मानतों. कारण ईश्वर म्हणजे वस्तू वस्तूंतील व मानवा मानवांतील सर्व संबंधावर यथार्थ व पूर्ण निर्दोष प्रकाश पाडणारी अशी विशुद्ध ज्ञानमयता.

'ज्ञानादेवतु कैवल्यम्', अथवा 'सर्वकर्माखिलम् पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' अशा उक्तींतील 'ज्ञान' या शब्दाने जें प्राप्त होतें तेंच परमेश्वरत्व, असें मी मानतों.

उ. २—धर्म म्हणजे यथार्थ विश्वदर्शनावर आधारलेलें नियामक तत्त्व; विश्वचक्राच्या व जीवनाच्या मुळाशी असलेलें सर्वव्यापक व सर्व नियामक सत्-तत्व. या अर्थानें 'धर्म' नांवाची वस्तु आहे, असें मी मानतों. विश्वास, श्रद्धा हे शब्द अहंकार, अभिमान, अभिनिवेश व अज्ञान यांना पोषक होणारे असल्यामुळें ते मी वापरूं इच्छित नाहीं.

धर्म ही मानवनिर्मित वस्तु नसून ती ईशनिर्मित, म्हणजेच ईश-मायानिर्मित वा पुरुष-प्रकृतिनिर्मित अशी वस्तु आहे. कारण हें विश्व मानवनिर्मित खासच नाहीं. म्हणून कुठल्याहि व कोणत्याही मानवाच्या नांवावर प्रसृत झालेले धर्म, हे धर्म नसून केवळ संप्रदाय आहेत, असें म्हणावें लागतें. पण जें जें केवळ मानवीय वा पौरुषेय तें तें मर्यादित व स्खलनशील असतेंच असतें. म्हणून वैदिकांनीं धर्म ही ईशनिर्मित व अपौरुषेय वस्तू आहे, असें जें म्हटलें आहे, तेंच यथार्थ आहे, असें मला वाटतें.

आपण ज्या विश्वांत राहतो तें एक तर नियमबद्ध (Cosmos) असावें, अथवा नियमशून्य (Chaos) असावें. तें नियमशून्य असल्यास जगाला व जीवनाला कसलाहि अर्थ प्राप्त होणें शक्य नाहीं. पण जगाला व जीवनाला अर्थ आहे, या निसर्गसिद्ध भावनेनेच जगाचे व जीवनाचे सर्व व्यवहार चालू आहेत, असें आपल्यास दिसून येतें. मानवाच्या दृष्टीनेच पाहिल्यास प्रत्येक माणूस हा कोणत्या ना कोणत्या पुरुषार्थसिद्धीसाठींच जगत असतो व नित्य धडपडत असतो, असें दिसून येतें. म्हणून जग वा विश्व हें अर्थपूर्ण व नियम-बद्ध असलेंच पाहिजे, असा निष्कर्ष निघतो.

विश्वाच्या मुळाशी असलेली स्वयंभू व चैतन्यमय नियामकता विश्वधर्म आणि या विश्वधर्मांचें यथार्थ ज्ञान करून घेऊन जीवन म्हणजेच जगणें हाच धर्मनिष्ठ परमपुरुषार्थ. क्षुद्र, मानवताविरोधी व निसर्ग विरोधी पुरुषार्थाकरता जगत राहणें हे पाप व परमपुरुषार्थाकरतांच अनुसरून जगणें हें पुण्य. म्हणूनच पाप-पुण्याची कल्पना विश्वधर्माशीं निगडित झालेली आहे व ती यथायोग्य आहे.

एक सुबुद्ध व जिज्ञासु मानव या नात्याने ज्ञानमय ईश्वराचें अस्तित्व आणि यथार्थ ज्ञानप्रक्रियेचे नियम मी मानतों. ईश्वरच विश्वधर्मांचा नियामक असल्यामुळें ईश्वराच्या साक्षात्काराचे जे नियम तोच धर्म, असें मी मानतों. वैदिक वर्णाश्रमधर्माच्या मुळाशीं जीं तत्त्वें आहेत, तीं ईश्वरसाक्षात्कारानुगामीं म्हणजे यथार्थ ज्ञानानुगामीं अशीं आहेत. अशा तत्त्वांवर समग्र मानवी समाजाची रचना झाल्याशिवाय जगांतील भयानक अज्ञान कदापिहि नाहीसें होणार नाहीं; आणि अज्ञान नाहीसें झाल्याशिवाय, अथवा त्याला जीवनांत निकृष्ट स्थान देऊन तें मर्यादेंत ठेवल्याशिवाय, जगांत शांति नांदणें व नित्य सर्जनशील प्रगतीला बहर येणें अशक्य आहे.—हें असें आहे, म्हणून मी धर्म मानतों.

उ. ३—ज्ञानसाधना हीच मी पूजा वा प्रार्थना मानतों व ती मी जोगवणीं शक्य तितकी अखंड करीत असतों. आपल्या अंतःकरणांत नित्य उसळणाऱ्या अनेकविधवृत्ति-प्रवृत्ति व निवृत्ति यांची समग्र प्रक्रिया स्थिर, अविवश व साक्षीवृत्तीने समजून घेणें; क्षणा-क्षणाच्या जीवनांत सत्य समजून घेण्याची ही प्रक्रिया अधिकाधिक सूक्ष्म व यथार्थ होईल इकडे अवधान देणें; आणि अशा रीतीने आत्मदर्शन व विश्वदर्शन यथार्थतेने करून घेण्यासाठींच शक्य तितका काळ घालविणें, हेंच ईश्वरानुसंधान आहे, असें मी मानतों, आणि म्हणून या अनुसंधानाला जें जें पोषक होईल तें तें मी वाचतों. यांपैकीं, अनुसंधानाला विशेष उपकारक होणारे कांहीं निवडक शब्दबंध माझ्या प्रत्यहींच्या पाठांत आले आहेत.

उ. ४—'दैवी वा अतिमानवी' असें ज्यांचें वर्णन करतां येईल असे अनुभव दोन प्रकारचे असावेत असें, मी केलेल्या परिमित अभ्यासाच्या आधारें, मला वाटतें. एक प्रकार म्हणजे केवळ आपली स्वतःचीच खात्री पटविणारा आणि दुसरा प्रकार म्हणजे इतर कोणा-चीहि खात्री पटविणारा. पैकीं, पहिल्या प्रकारचे अनुभव मला आलेले आहेत. पण त्यांची व्याप्ति माझ्यापुरतीच परिमित असल्यामुळें, ते अनुभव सांगणें व्यर्थ आहे.

असे हे अनुभव प्रत्येकाला प्रत्येक क्षणीं येतच असतात पण त्यांकडे त्यांचें लक्ष जात नाहीं, एवढेंच.

उ ५—आणखी वाटेल तितकें सांगतां येणें शक्य आहे. पण मग तो एक ग्रंथच होईल. आणि तुम्हाला तर "अत्यंत थोड्या शब्दांत" तुमच्या प्रश्नांचीं उत्तरें हवीं आहेत. म्हणून इतकेंच पुरें.

**टीपः**—माझ्या भूमिकेचें अधिक स्पष्टीकरण ज्यांना हवें असेल त्यांनी माझी (१) विश्वदर्शन अथवा नासदीयसूक्त-नीराजन, (२) आहुति (कादंबरी) व (३) सप्तश्लोकी भागवत अथवा ज्ञानयुक्त भक्तियोग, हीं अलीकडेच प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें नजरे-खालून घालावीं, अशी नम्र विनंती आहे.

• • •



अनुक्रमणिका









—हे चिनी थांबोळ कधीं करीतच नाहींत...साप, बेडूक, कुत्री, मांजरें सर्व कांहीं खातात. ! कोंबडीची चोंच सुद्धां शिल्लक ठेवीत नाहींत !...व्यवहारांत काय नि कुटुंबांत काय नीति म्हणून कसली नाहींच ...!

# शेंगशुई ते लोवू

—अनंत काणेकर

**३१ मे १९५५**

पहांटे लवकर उठून डेकवर आलों. समोर हाँगकाँगमधल्या डोंगरांच्या माथ्याभोंवतीं राखी पांढरे ढग घुटमळत असलेले दिसले. खालीं उतरून बंदरांत सहज फेरी मारायला गेलों. तिथें धक्क्याच्या आसपास आपण चीनमध्यें आहोंत याची आठवण करून देणारें,–लहानपणीं पुस्तकांत वाचलेलें दृश्य दिसत होतें. चीनमध्यें लोकसंख्या फार असल्यामुळें बरेच लोक बारा महिने नदीच्या पात्रांत किंवा समुद्रावर होड्यामध्येंच रहातात आणि संसार करतात, असें वाचलें होतें. बंदरांत कितीतरी चिनी होड्या किंवा 'सांपन' दाटीवाटीनें पाण्यांत डुचमळत होत्या. चिनी सांपनचीं शिडें आपल्याकडल्यापेक्षां वेगळीं,–एक टोंक लांबलेल्या पतंगासारखें चौकोनी, आणि घडीच्या पंख्यासारखीं जागच्या जागीं मिटतां येणारीं असतात. प्रत्येक होडींत सबंध कुटुंबाचा संसार होता. तुकतुकीत काळ्या कपड्यांतील पुरुष तोंड धूत होते, तर बायका चुली पेटवीत होत्या. कुठें मुलें वाडग्यांतलें खाणें काड्यांनीं पटापटा खात होतीं. कांहीं होड्यांवर पाळलेलीं कबुतरें आणि कोंबड्या फिरत असलेल्या दिसल्या; कांहींवर कुत्रीं, मांजरें घरांतल्यासारखीं पहुडलीं होतीं किंवा ये–जा करीत होतीं !

कावलूनपासून दक्षिण चीनचें मुख्य शहर कॅन्टन साठसत्तर मैल आहे. कावलूनहून कॅन्टनला रेल्वे जाते; पण कावलूनपासून वीसएकवीस मैलांवर असलेल्या लोवू स्टेशनाकडे ब्रिटिश हद्द संपते, आणि पुढें शेंपन्नास यार्डांवर कम्युनिस्ट चीनची हद्द सुरू होते. 'चीनमध्यें जायचा चिनी सरकारचा परवाना असलेल्यानांच पुढें कॅन्टनकडे जातां येते. आजच हाँगकाँगमधल्या एका वृत्तपत्रांत वाचलें कीं कुणीतरी एक ब्रिटिश वैमानिक १९५० सालापासून कम्यूनिस्ट चीनच्या तुरुंगांत होता त्याला काल कॅन्टनहून लोवू येथें आणून सोडून देण्यांत आलें. आज दुपारीं लोवूपर्यंत जाऊन येण्याचा विचार करून तीन साडेतीनच्या सुमाराला कावलून स्टेशनांत गेलों. ४ २७ ला गाडी होती. रात्रीं ७–८ वाजेपर्यंत परत यायला गाडी आहे किंवा काय याची चवकशी करून आम्हीं रिटर्न तिकीट घेतलें. तिकिटांच्या खिडकींतला माणूस म्हणाला, 'लोवूच्या अलिकडल्या शेंगशुइ स्टेशनाचें तिकिट घ्या. तुम्हाला नुसतें गमतीनेंच जाऊन यायचंय ना ?—मग उगाच लोवूपर्यंत जाऊं नका. तिथें हद्दीवरले पासपोर्ट अधिकारी असतील. पलीकडे कम्युनिस्ट सैनिक असतील, अनेक चवकशी होतील. कशाला जातां लोवूपर्यंत ?—दुसरं असं कीं शेंगशुइ–लोवूमधलं अंतर इतकें थोडें आहे कीं, शेंगशुइच्या फलाटावरूनें तुम्हांला लोवूचें स्टेशन, पलीकडील डोंगर वगैरे सहज दिसतात.'



आम्ही त्यांचा सल्ला मानून शेंगशुईचेंच तिकिट घेतलें. बरोबर ४–२७ ला गाडी सुटली. दुसऱ्या वर्गाचे बाक गाद्यांचे होते. एका बाकावर दोन जागा होत्या. दोन बाकांमध्यें चहाचें लहानसें टेबल वगैरे चांगली व्यवस्था होती. राखी रंगाच्या गणवेषांतले छोकरे चॉकोलेट, ग्रीन स्पॉटच्या बाटल्या, सिगारेट वगैरे विकीत मधून मधून फिरत होते. लवकरच 'येवनाती' स्टेशन आलें. कावलूनच्या अगदीं शिवेजवळच हें स्टेशन आहे. बंगलेवाले रहातात तो बाऊंडरी रोड इथून जवळच आहे. पलीकडे एका बाजूला उघडे बोडके लाल-पिवळ्या मातीचे डोंगर दिसत होते तर दुसऱ्या बाजूला दूरवर हिरवेगार डोंगर दिसत होते. या बाजूला गरीब चिन्यांची वस्ती बरीच दिसे. डोंगराच्या पायथ्याशीं आणि आजूबाजूला काळवंडलेल्या लाकडी फळ्यांच्या,–एकमेकांना खेटून राहिलेल्या झोपड्यांचे पुंजकेच्या पुंजके वडारांच्या पालासारखे दिसत होते. मध्येंच गाडी एका बोगद्यांत शिरली. बाहेर यायला तिला चांगलीं पांच दहा मिनिटें लागलीं, आणि कोळशाचें इंजिन असल्यामुळें डब्यांत धूरच धूर होऊन आम्ही गुदमरल्यासारखे झालों. बोगद्यांतून बाहेर आल्यावर समोरच्या डोंगरांत वर जाणारा एक वाटरस्ता आणि दारांत दीपमाळ असलेलें एक जुनाट बुद्धमंदिर दिसलें. आतां दोन्ही बाजूंना हिरवा गार भातशेतें, भाज्यांचे मांडव, फळांच्या बागा दिसत होत्या. मध्येंच

एकाद्या खेड्यांतल्या गरीब शेतकऱ्यांचीं काळवंडलेल्या सिमेंटच्या पत्र्याची घरें दिसत होती. चिनी लोक डुकरांचे मांस फार खातात. एखाद्या गावांत गलेलठ्ठ डुक्कर चरत असलेल्या छोट्या गोठ्यांची लांबच लांब रांग दिसे. खेडवळ चिनी दुकानें मजेदार दिसतात. 'दुकानांसमोरच्या पिवळ्या खांबावर काळीं अक्षरें एकाखालीं एक लिहिलेलीं असतात. मध्येंच एखाद्या सुखवस्तु चिन्याचा किंवा ब्रिटिश साहेबाचा तांबड्या खिडक्यांचा आणि हिरव्या कठड्यांचा टुमदार पांढरा बंगला दिसे. 'शाटीन' स्टेशनानंतर डोंगरांच्या रांगांतून मध्येंच एकदम समुद्र दिसूं लागला. समुद्रांत कुठेंकुठें मांडवासारख्या काठ्या उभ्या करून चिनी कोळ्यांनीं लावलेलीं जाळीं दिसत होतीं. तें मोठें अद्भुतरम्य निसर्ग दृश्य दिसत होतें. आकाशांत ढग जमून चांगलाच पाऊस पडत होता. हिरव्या गार डोंगरांवर कुठेंकुठें दाट धुकें दिसत होतें; तर कुठें खंडाळ्याच्या घाटांतल्यासारखे छोटे छोटे धबधबे कोसळत होते, एका बाजूला समुद्र एका बाजूला हिरव्यागार डोंगरावरले धबधबे आणि वरून पाऊस—पावसाच्या धारांखालीं घाट आणि कोंकण एकमेकांना बिलगल्यासारखी दिसत होतीं! एका डोंगरांत बरेच ठिकाणीं खोदल्यासारखें दिसत होतें. तिथें शिशाच्या आणि लोखंडाच्या खाणी आहेत म्हणे.

त्यानंतर 'तायपो' स्टेशन आलें. स्टेशनापलीकडे बरींच दुकानें आणि चिनी बायकापुरुषांची गर्दी दिसत होती हें फार जुनें गांव आहे, आणि इथें मासे आणि फळांचा फार मोठा व्यापार चालतो. गाडी सुटली, आणि आजूबाजूला हिरवे गार डोंगर आणि हिरवीगार भातशेतें दिसूं लागलीं. शेतांत काम करणाऱ्या तुकतुकीत काळ्या कपड्यांतल्या चिनी शेतकरणींच्या डोक्यावर चटईच्या घंगाळटोप्या आणि अंगावर प्लास्टिकचे निळे पाऊसकोट दिसत होते. नंतर 'फातलिंग' स्टेशन आलें. पुढच्या 'शेंगशुई' स्टेशनावर आम्ही उतरणार. आमच्या डब्यांतली एक चिनी बाई आपल्या तान्ह्या मुलाला घेऊन 'फातलिंग' स्टेशनांत उतरली. तांबड्या रेशमी कापडाची चार टोकांना चार पट्ट्या लावलेली एक चिमुकली गोधडी तिच्याकडे होती. तिच्यांत मुलाला ठेवून तिनें तें आपल्या पाठीशीं बांधलें व हातांत इतर सामान घेऊन ती गाडींतून उतरली. कावलूनमध्यें कामाला आलेले बरेच चिनी स्त्रीपुरुष गाडींत होते. आम्ही इकडेतिकडे पहात होतों. इतक्यांत आमच्यासारखाच भारतीय दिसणारा एक तीसपस्तीस वर्षांचा गृहस्थ आमच्याकडे आला, आणि 'तुम्ही हिंदी आहांत का?' म्हणून त्यानें आम्हाला विचारलें.

'हो,' आम्ही म्हणालों.

'माझं नांव नासीर हुसेन. मी पाकिस्तानी आहे,' तो म्हणाला, 'मी इथंच असतों. तुम्हाला बघून किती आनंद झाला मला. कांहीं झालं तरी एकाच देशांतील आपण.'



'शेंगशुई' आणि 'लोवू' स्टेशनामध्यें कम्युनिस्ट चीनच्या सीमेअलिकडे शंभर यार्डावर डोंगराच्या पायथ्याशीं नदीकाठी तो एकटाच रहात होता. अतिशय मोकळेपणानें तो आमच्याशीं गप्पा करीत होता. खरोखरच त्याला फार आनंद झालेला दिसला. कावलून, न्यू टेरिटोरीजमधल्या ब्रिटिश सैन्याला न्हावी, धोबी, शिंपी, चांभार पुरवण्याचें कंत्राट त्याच्याकडे होतें. ब्रिटिशांच्या मलायांतल्या सैन्यांत गुरखे आहेत तसेंच इथल्या सैन्यांत दोनतीनशें पाकिस्तानी असल्याचें त्यानें सांगितलें. पाकिस्तानी पंजाबांतल्या गुजरात गांवांत त्याचें घर; पण आईबाप इजिप्तमध्यें रहायला गेलेले! नासीर हुसेन कांहीं दिवस सायप्रसमध्यें होता. शेंगशुईत आपलें बरें चाललें आहे, तो म्हणाला.

एकंदर चिनी लोकांविषयीं त्याचें वाईट—म्हणजे फारच वाईट मत दिसलें. 'माझ्या हाताखालीं शेंपन्नास चिनी स्त्रीपुरुष काम करतात'; तो म्हणाला, 'चोर–बदमाष, गंदे...'

'त्यांना इतक्या शिव्या द्यायला काय झालं?' मी म्हणालों.

'काय सांगूं तुम्हाला! भारी घाणेरडे लोक हो! काळ्या कंतानाचे कपडे बायका नि पुरुष उगाच नाहीं घालीत ते—आंघोळ कधीं करीतच नाहींत. ओल्या टॉवेलनें कधींमधीं अंग पुसतात. साप, बेडूक, कुत्री, मांजरं–सर्व कांहीं खातात! कोंबडीचे पाय नि चोंचसुद्धां शिल्लक ठेवीत नाहींत हो! वर्तनहि तसंच घाणेरडं. व्यवहारांत काय नि कुटुंबांत काय, नीति म्हणून कसली नाहींच!...'

त्याच्याकडे काम करणाऱ्या अगदीं खालच्या वर्गातल्या मोलमजूरी करणाऱ्या चिन्यांसंबंधीं तो बोलत होता, हें उघड आहे. स्वच्छ परीटघडीचे सुंदर युरोपियन पद्धतीचे कपडेलत्ते केलेले किती तरी चिनी स्त्री-पुरुष आम्ही हॉंगकॉंगच्या रस्त्यावर पाहिले होते. मात्र चिनी लोक कुत्रीं, मांजरें सुद्धां खातात, ही गोष्ट खोटी नसावी; कारण आजच्याच 'हॉंगकॉंग स्टॅण्डर्ड' कीं दुसऱ्या कुठल्या तरी पत्रांत एका चिनी बाईला मेलेल्या मांजराची कातडी सोलून तें खाण्याकरतां कापीत असतां पोलिसांनी पकडल्याचें, आणि मॅजिस्ट्रेटनें तिचा हा असल्या प्रकारचा दुसऱ्यांदा केलेला गुन्हा असल्यामुळें पाऊणशें डॉलर दंड केल्याचें मी वाचलें होतें. एका वृत्तपत्रांत एका युरोपियन प्रवाशानें केलेलें चोरटी अफू ओढण्याच्या हॉंगकॉंग–कावलूनमधल्या गुप्त अड्ड्यांचें वर्णन वाचलें. चोरट्या दारूचे मुंबईत असेच अड्डे आहेत. दारूच्या गुत्त्यांत ज्याप्रमाणें उकडलेलीं अंडीं किंवा मसालेदार मटन खायला देतात त्याप्रमाणेंच कावलूनमधल्या या अफूच्या अड्ड्यांत कोंवळ्या कुत्र्याचें मांस खायला देतात. सहा महिन्याच्या आंतल्या वयाच्या आणि काळ्या रंगाच्या कुत्र्याचे मांस विशेष किंमतीला विकलें जातें. अट्टल चिनी अफूबाज वाटेल ती किंमत देऊन तें मिटक्या मारीत खातात! अफू आणि कुत्र्याचें मांस या दोहोंनाहि कायद्यानें कडक बंदी आहे. त्यामुळें या चोरट्या

भंड्यांत प्रवेश मिळवायला 'आंतली' ओळख आपण कशी काढली तेंहि या लेखांत सांगितलें होतें !

बोलतां बोलतां—'शेंगशुई' स्टेशन आलें. संध्याकाळचा साडेपांच सहाचा सुमार झाला होता. आकाश ढगाळलं होतें. पाऊस झिम् झिम् पडतच होता. 'शेंगशुई' हें आमच्या मुंबई जवळच्या भाइंदर किंवा मिरारोडसारखें अगदींच छोटें स्टेशन आहे. अर्ध्या तासानें परत जायला गाडी होती. तेव्हां स्टेशनाच्याच आवती भोंवती इकडे तिकडे फिरण्याचें आम्ही ठरविलें. स्टेशनांतून 'शेंगशुई' रस्त्याची नि पलीकडे डोंगराच्या पायथ्याशीं पांच-दहा पांढऱ्या घरांचा पुंजका असलेल्या सरहद्दीवरल्या 'लोंबू' खेड्यांची चांगली कल्पना येत होती.

'त्या लोबूच्या डोंगराच्या पलिकडे झाडी दिसते ना ?-तिथेंच लहानशी नदी आहे. तिथल्या एका घरांत मी राहातों,' फलाटावरून ती झाडी दाखवीत नासीर हुसेन सांगत होता. फलाटावर एक लहानसें चहाचें दुकान होतें. तिथें आग्रह करून नासीरनें आम्हाला नेले. 'चहा किंवा कांहींतरी पेय तुम्ही घेतलेंच पाहिजे,' तो म्हणाला, 'खरं' म्हणजे तुम्ही माझे पाहुणे आहांत इथं घरीं नेऊन तुम्हाला जेवण दिलं पाहिजे मी. पण तुम्हाला परत जायची घाई आहे. मीहि एकटा रहातों जेवण तरी काय देणार ? 'ग्रीन स्पॉट' पेय त्यानें आम्हाला प्यायला दिलें. स्टेशनां-तलें तें चहाचें दुकान फार तर सहा फूट लांब आणि पांच फूट रुंद असेल. बिस्किटांच्या बरण्या, कपबशा, एक टेबल आणि कांहीं खुर्च्या तिथें होत्या. दुकानाला लागूनच त्याहूनहि लहान चारपांच फूट लांबीरुंदीचें सैपाकघर होतें. तिथें त्या चिनी दुकानदाराचा सर्व संसार होता. नवऱ्याप्रमाणेंच तुकतुकीत काळ्या कपड्याचा सदरा पायजमा घातलेली त्याची बायको चुलीकडे कांहींतरी करीत बसली होती. सगळीकडे सारख्या माशा घबघबत होत्या. मध्येंच कोंबड्या 'को' 'को' करीत येऊन पायाशीं अडखळत होत्या. भिंतीला बांधलेल्या मच्छरदाणीखालीं जमिनी-वर टाकलेल्या फडक्यावर एक लहान मूल झोपलें होतें. सतरा अठरा वर्षांचा दांडगट दिसणारा एक चिनी पोरगा टेबलावर दोन



भले मोठे पाव आणि दुधाचा वाडगा घेऊन खायला बसला होता. 'मालकाचा हा मुलगा' नासीर हुसेन म्हणाला. मालकाशीं चिनी भाषेंत नासीर कांहीं बोलत होता, इतक्यांत मोठ्याथोरल्या दुधी भोपळ्याच्या आकाराच्या दोन टोपल्या दोन टोंकांना अडकलेली कावड खांद्यावर घेऊन फलाटावर एक चिनी शेतकरी आला. कावड फलाटावर ठेवून तो उभा होता. 'त्या टोपल्यांत काय आहे ?' आम्ही नासीरला विचारलें.

'तुम्हीच त्याला विचारा,' तो हंसून म्हणाला.

त्या शेतकऱ्याजवळ जाऊन खुणेनें या टोपल्यांत काय आहे, म्हणून मी विचारलें. तोंडाकडे हात नेऊन तो 'चाव' म्हणाला 'चाव' म्हणजे खाणें. हातवारे करीत इकडून तिकडून पकडून आपण तें या टोपलींत ठेवलं आहे, असें तो सांगत होता. टोपली उघडू का, असें खुणेनें विचारून आम्ही एक टोपली उघडून पाहिली. शेतांत उडणारे हिरवेगार नाकतोडे टोपलींत भरलेले होते. तें एकदम उडून जाऊं नयेत म्हणून वर हिरवेंगार गवत भरलें होतें.

नासीर म्हणाला, 'हे लोक हे नाकतोडे खातात !'

'काय–म्हणतां काय ?' मी उद्गारलो.

'सांगितलं ना ? नाकतोडे, टोळ, सर्व कांहीं हे लोक खातात,' तो म्हणाला, 'टोळ तर मुद्दाम खातात. टोळ आमचं धान्य खातात म्हणून आम्ही त्यांनाच खाऊन टाकतो,' असं हे म्हणतात ! टोळधाड आली कीं गोणी भरून टोळ पकडायचे, ती गोणी उकळत्या पाण्यांत बुडवायची नि मग तें उकडलेल्या टोळांवर ताव मारायचा !'

स्टेशनाच्या बाजूला एक तळें होतें. त्यांत कोबीच्या पानासारख्या दिसणाऱ्या लेट्यूस भाजीच्या टोपल्या कावडीनें वाहून आणून शेतकऱ्यांच्या बायका धुण्याकरतां टाकीत

होत्या. स्टेशनच्या बाहेर समोरच एक हिरव्या फळ्यांची टुमदार इमारत दिसत होती. तिच्यावर 'शेंगशुई व्हेजिटेबल मार्केटिंग को-ऑपरेटिव्ह सोसायटी,' अशी पाटी होती.

'अगदींच छोटं खेडं आहे हें,' नासीर हुसेन सांगत होता, 'इथं राहाणं म्हणजे अक्षरशः वनवास आहे. कोणत्याही प्रकारची करमणूक इथं नाहीं. हाँगकाँगमध्यें 'आन' किंवा 'आवारा'सारखा एखादा हिंदी चित्रपट केव्हां केव्हां येतो. तो तिथं जाऊन पाहायचा.'

स्टेशनाच्या दाराशीं सायकल घेऊन उभ्या असलेल्या एका चिन्याला बोलावून नासीर चिनी भाषेत त्याच्याशीं कांहीं तरी बोलत होता.

आमच्याकडे बघून तो चिनी त्याला म्हणाला, 'तानशी यक्रो!'

तो काय म्हणाला, म्हणून आम्ही नासीरला विचारलें. 'तानशी यक्रो' म्हणजे एकट्यालाच का?' 'तुला एकट्यालाच न्यायचं कीं पाहुण्यांनासुद्धां?' असें तो सायकलवाला नासीरला विचारीत होता. शेंगशुईत वाहनाची ही औरच तऱ्हा आहे. सायकलच्या मागें एक छोटीशी फळी लावलेली असते. पिन्वर रहातात तसें त्या फळीवर गिऱ्हाइकानें उभें राहायचें, आणि सायकलवाल्याला हवें तिकडे न्यायला सांगायचें!

'माझ्या घरापर्यंत न्यायला काय घेशील म्हणून त्याला मी विचारतोय,' नासीर म्हणाला, 'नेहमीं अर्धा हाँगकाँग डॉलरमध्यें म्हणजे सात आण्यांत हे रोज तिथपर्यंत येतात. आज पाऊस पडतोय् ना—म्हणून हा लुच्चा सबंध डॉलर माझ्याकडे मागतोय्!'

इतक्यांत गाडी आली आणि नासीरचा निरोप घेऊन आम्ही गाडींत चढलों.

सात सव्वासातला 'येवमाती' स्टेशनांत उतरून बंबावाल्यांच्या घरीं जेवायला गेलों. वांग्यांची सुंदर भाजी केली होती. बंबावाले म्हणाले, "कृष्णाकांठच्या वांग्यांसारखीं सुंदर वांगीं हाँगकाँगमध्यें मिळतात!"

रात्रीं साडेदहा अकराच्या सुमाराला बोटीवर परत आलों. बंदराच्या आसपास काळ्या कपड्यांतले कितीतरी मवाली दिसणारे उंच, ठेंगू, लठ्ठ, सडपातळ चिनी स्त्रीपुरुष उगाच इकडेतिकडे फिरत्या मारीत असलेले दिसले. कोणत्याहि बंदराजवळचे वातावरण बहुधा बकाल असतें. त्यांत काळोख्या कोनाकोपऱ्यांत संशयास्पद हालचाली करणाऱ्या त्या लोकांना पाहून थोडी भीतीच वाटली. आज सकाळींच हाँगकाँगच्या वृत्तपत्रांत शहरांतल्या गुंडगिरीबद्दल बरेचसें वाचलें होतें. सुशिक्षित गुंडांच्या चाळयांबद्दल एका वृत्तपत्रानें अग्रलेखच लिहिला होता. इंग्लंडमध्यें जसे 'टेडी बॉईज' किंवा अमेरिकेंतले 'झूटसूटर्स' तसेच हाँगकाँगमधले हे गुंड. त्यांना 'आह् फेइ' म्हणतात. 'जाँ' किंवा तंग निळ्या तुमानी आणि रंगीबेरंगी शर्ट घालून दहा दहा अकरा अकरांच्या टोळ्या करून हे 'आह फेइ' फिरतात. शाळेंत जाणाऱ्या मुलींना सतावणें, मुलांना एकटेदुकटे गांठून फीचे पैसे त्यांच्या खिशांतून काढून घेणें, बायकांच्या पोहोण्याच्या जागांभोवतीं घिरट्या घालणें, इतर नागरिकांनाहि अधूनमधून छुबाडणें, असले प्रकार करीत हे चिनी तरुण गांवांत फिरत असतात.

• • •





अनुक्रमणिका

सभोवतालच्या वातावरणाला, त्या वातावरणांत रमलेल्या स्त्री-पुरुषांना, फार काय अवघ्या वस्तुमात्राला गति आलेली असतांना असें एका जागीं स्थिर बसून राहणें माझ्या सहनशक्तीपलीकडे चाललें आहे हें माझ्या ध्यानांत आलें तेव्हां बसल्या जागेवरुन मी उठलो आणि निर्हेतुकपणे हॉलच्या दिशेने चालू लागलो. दरवाजांतच रॉबर्ट आडवा आला. मला थांबवून त्याने विचारले, "अरे, इतका वेळ कुठं होतास ?"

त्याचा हा प्रश्न ऐकून मी चमकलो. माझी चौकशी करीत, जिच्यासाटीं मी इतका वेळ खोळंबून बसलो होतो तीच तर येऊन गेली नव्हती ? शंका आली म्हणून मी घाईघाईत रॉबर्टला विचारले, "माझी चौकशी करीत कुणी आलं होतं काय ?" माझा प्रश्न ऐकून तो हंसला आणि थंडपणें म्हणाला, "अशा ठिकाणी आणि अशा वेळीं कधीं कुणी कुणाची चौकशी करीत नाहीं."

"ते मला ठाऊक आहे" माझ्या बोलण्यातील तुटकपणाने तो एकदम दचकला. त्याच्या बोलण्याने मी दुखावलो आहे हें ध्यानांत येऊन त्याने एकदम मृदु आवाजात विचारले, "अजून तुझी मैत्रीण आली नाही काय ?" आणि माझ्या ह्या स्थितीविषयी हळहळ व्यक्त करून सहानुभूति दर्शविण्याकरतां त्याने माझा हात हातात घेतला आणि एकदम त्याच्या तोंडून उद्गार निघाला, "अरे, तुझे तळवे किती तापले आहेत !"

"त्याच्या हातातून हात सोडवून घेत मी म्हटलं, "माझे हात नेहमीच असे असतात—"

"दोस्त, अरे इतराना ह्या थापा मार" असें म्हणत त्याने माझ्या डोळ्यांत रोखून पाहिले आणि विचारले, "तुझ्या डोळ्यांत नेहमीच रक्त उतरलेलें असते काय ?"

"रॉबर्ट—" माझ्या काकुळतीला येण्याने त्याने मला छेडणे सोडून दिले आणि विचारले, "एखाद्याला विष चढले तर काय करतात ?"

"विषावर उतारा देतात—" माझें हें उत्तर ऐकून तो हंसला आणि कोंपऱ्यांतल्या एका टेबलाकडे बोट दाखवून म्हणाला, "ती पाहिलीस—" आणि जास्तकमी कांहीं न बोलतां शीळ घालीत तो चालूं लागला.

माझ्याचप्रमाणें कुणाची तरी आतुरतेने वाट पहात बसलेल्या त्या बाईकडे बोट दाखवून रॉबर्ट काय सुचवूं पहात होता ? हा मला समजला तरी काय ? दिसेल त्या बाईबरोबर लघळपणा करणारा पुरुष मी नव्हे हें माझ्याबरोबर त्याच्या हॉटेलांत येणाऱ्या देखण्या स्त्रियांवरून तरी त्याच्या लक्षांत यावयास हवें होते.. कीं स्त्री—सौंदर्याविषयीचा माझा चोखंदळपणा ठाऊक असूनही, वेळप्रसंगी मी तडजोड करीन असें वाटल्यावरून त्याने खडा टाकून पाहिला होता ? कुठें यौवनसंपन्न रूपा आणि कुठें ही तिशीच्या पुढें झुकलेली प्रौढा ! कुठे रूपाचा अटकर बांधा आणि कुठें हिचे सुटलेले स्थूल शरीर ! कुठे उमलत्या फुलाप्रमाणे सतेज आणि टवटवीत असलेली रुपा आणि कुठें ही पाकळ्या गळूं लागलेल्या फुलाप्रमाणे दिसणारी गलीतगात्र बाई ! शीः शी ! ही तुलना तरी मी कशासाठीं करीत आहे ? तुलना करण्याच्या मिषाने तर मी पुन्हा पुन्हा तिच्याकडे पहात नाही ? हे तापलेले रक्त मला दगा तर देणार नाही ? माझ्या शरीरांत टाण मांडून बसलेला विकारांचा सैतान माझा बळी तर घेणार नाहीं ? पण हे कसें शक्य आहे ? हें गति आलेले वातावरण स्थिर कां होत नाही ? वेडावणारे हे संगीताचे सूर लोप कां पावत नाहीत ? रुपा अजून कां येत नाही ? कां नाही ? ?

आधार घेऊन मी शेजारच्या खुर्चीवर बसलो आणि टेबलावर डोकं टेकले. अजूनही रुपा येईल आणि ह्या विचित्र कात्रीतून माझी सुटका होईल असें माझ्या वेड्या मनाला वाटत होते. माझे हातपाय कमालीचे तापले होते. कानाचे चाफे गरम झाले होते. डोक्याच्या शिरा थाड्थाड् उडत होत्या. रक्त डोळ्यांत उतरत होते. उष्णतेच्या लाटेमागून लाटा माझ्या शरीरांत उठत होत्या. आणि हा आवेग सहन न होऊन माझे हातपायही आता थरथरूं लागले होते. टेबलावर ठेवलेला पाण्याचा ग्लास मी उचलला आणि तोंडाला लावला. रिकामा झालेला थंड ग्लास मी डोळ्यांवर टेकवला, कपाळावरून फिरवला. तापलेल्या शरीराने थंड व्हावे म्हणून मी पराकाष्ठा करीत होतो आणि तापलेल्या शरीराने पेटावे म्हणून सभोवतालचे रंगीबेरंगी वातावरण मला चेतवीत होते. आणि ह्याच्या भराला ती बया डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून पुन्हा पुन्हा माझ्याकडे पहात होती. लहरणारे संगीताचे सूर माझ्या भोंवती फेर धरीत होते. नाना तऱ्हेने मला सांगत होते कीं रुपा आता येणार नाहीं, वेळ टळून गेली आहे. ती कोंपऱ्यांत बसलेली बाई तुझीच वाट पहात आहे. आमच्या हाताना धरून चल. आम्हीं तुझ्या सांगाती राहूं.

आणि हें सुरांचे बोलणे खरें आहे हें सांगण्याकरतां ती पुन्हा पुन्हा माझ्याकडे पहात आहे. पुन्हा पुन्हा पहात आहे. अशी पहात आहे कीं नजरेने मला खुणावीत आहे. पुन्हा पुन्हा खुणावीत आहे. ती माझ्याकडे अशा रीतीने पहात असतानाच मी जागेवरून उठलो. मी काय करीत आहे हें माझ्या लक्षांत यावयाच्या पूर्वीच तिच्या दिशेने चालूं लागलो. मी तिच्या शेजारी जाऊन उभा राहिलो तेव्हां ओळख नसल्याप्रमाणे ती माझ्याकडे पाहूं लागली. अनुनयाचे सारे प्रकार इथेही मला करावे लागणार होते काय ? हिरमोड होऊन थप्पड खावी लागणार होती काय ? पण ह्या गोष्टीचा विचार करायला मी आता माझा राहिलो नव्हतो. धीर करून मी पुढें झुकलो आणि विचारले "Care to have a fag ?"

"Yes" आणि खांदे किंचित् उडवल्यासारखे करून तिने माझ्या डोळ्यांत खोल पहात म्हटले, "If you so desire." आणि तिच्या ओंठातली सिगारेट पेटवताना हलकेच विचारले, "मी इथं बसूं शकतो काय ?" आणि तिच्या शेजारीं बसतांना माझ्या लक्षांत आलें कीं प्रश्न विचारतांना माझा आवाज कमालीचा घोगरा झाला होता.

• • •

अनुक्रमणिका

## नव्या सांप्रदायाचे लौकिकवान विनोदी लेखक श्री. वसंत सबनीस यांनीं

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरं तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचे गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल का. के. मणियार वाळुंज यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.




**अनिल दि. फडके** (औरंगाबाद)

**प्रश्न—माणूस या शब्दाची व्याख्या आपण कशी कराल ?**

**उत्तर**—वाचणारा प्राणी म्हणजे माणूस आणि 'दीपावली' वाचणारा चांगला माणूस.

**रा. व. हजिरनीस** (सिकन्दराबाद)

**प्रश्न—रशिया चन्द्रावर मनुष्य पाठविणार आहे असें म्हणतात. मी चन्द्राकडे जाणारा पहिला माणूस होऊं इच्छितो. मी काय करावे ?**

**उत्तर**—रशिया ज्यावर मनुष्य पाठविणार आहे तो चन्द्र आकाशांतला आहे; पण तुम्ही ज्या चन्द्राकडे जाऊ इच्छिता ती कोठे राहते याचा खुलासा कराल काय ?

**संतोष चिपळूणकर** (मुंबई)

**प्रश्न—यशस्वी संसाराची गुरुकिल्ली कोणती ?**

**उत्तर**—समरप्रसंगीं तोंडाला कुलूप घालणें—

**प्र.—संसाराच्या गाड्याची स्त्री व पुरुष हीं दोन चाकें मानली तर तो गाडा ओढणारा बैल कोण ?**

उ०—पगार—

**वि. द. मंत्रवादी** (म्हापसे गोवा)

**प्रश्न—विश्वाचा विस्तार केवढा ?**

**उत्तर**—ज्याच्या त्याच्या डोक्या एवढा.

**प्रश्न रेडिओत जाहिरात देणें चांगलें कीं मासिकांत ?**

**उत्तर**—अर्थात् मासिकांत आणि तीहि 'दीपावलींत' ! शिवाय आपल्या पूर्वजानीं सांगितलेंच आहे कीं कानापेक्षा डोळ्यावर अधिक विश्वास ठेवावा !

**वा. वा. अमृते** (पापर्डी)

**प्रश्न—लग्न हा स्त्रीच्या जीवनांत माहेर आणि सासर यांतील पूल समजला जातो मग पुरुषाच्या जीवनांत त्याचे काय स्थान ?**

**उत्तर**—आपल्याकडे अशी एक समजूत होती कीं पुलाच्या पायांत जिवंत माणसाचा बळी दिल्याशिवाय पूल उभा रहात नाहीं—यापेक्षां अधिक खुलाशाची जरूरी आहे काय ?

**प्रश्न—व्यवहार आणि शहाणपण यांची सांगड कशी घालावी ?**

**उत्तर**—गाढवपणाचा व्यवहार करू नये आणि अव्यवहार्य शहाणपण दाखवू नये !

**व ध. झांबरे** (अमरावती)

**प्रश्न—आज मानवाची धाव चन्द्रापर्यंत पोचली आहे. समजा उद्या अमर होण्याचा शोध लागला तर ?**

**उत्तर**—तर माणूस मरणाचा शोध लावण्याचा खटाटोप करील !

**सौ. सुनीता सोमण** (मुंबई)

**प्रश्न—कोणत्या उपायानी स्त्री पुरुषाला अंकित करते ?**

**उत्तर**—हे आम्ही तुम्हाला सांगायचं म्हणजे स्टेशनमास्तरला आगगाडीचं वेळापत्रक समजावून सांगण्यासारखं होईल—

**केशव शिरसेकर** (मुंबई)

**प्रश्न—प्रेमिकांना चन्द्रच कां आवडतो ?**

**उत्तर**—प्रेमाला सतत उजेड सहन होत नाहीं. ही सोय फक्त चंद्रच करूं शकतो—

**प्रश्न—माझा एक ४५ वर्षांचा मित्र आहे. शरीरानें भक्कम, स्वभावानें गोड, रूपानें चांगला व सांपत्तिकदृष्ट्या ठीक आहे. पण ब्रह्मचारी आहे. आपण त्याला काय उपदेश कराल ?**

**उत्तर**—आपण भारतीय जनतेतील विषमता नष्ट करण्याचे असिधाराव्रत हातीं घेतले असतांना या एकट्या माणसाला सतत ४४ वर्षे सुख भोगण्याचा कांहींही अधिकार नाहीं ! आणि उपदेशाबद्दल म्हणाल तर त्यानें आपलें शेंपूट तोडून घ्यावें आणि कसें हलके हलके वाटते तें पहावे !

**अ. शं. करंदीकर** (बोरीवली)

**प्रश्न—तुम्हाला चंद्रावर पाठविले तर तुम्ही तुमच्याबरोबर काय काय न्याल ?**

**उत्तर**—दाढीचें सामान.

**प्रश्न—जीवन हें एक कोडें आहे असें म्हणतात, परंतु तें सुटल्यावर बक्षिस काय मिळणार ?**

**उत्तर**—तेंहि एक कोडेच आहे ! तथापि जीवनाचें कोडे न सुटल्यामुळें आजपर्यंत प्रत्येकाची जीवनांतून उचलबांगडी मात्र झालेली आहे ! कोडे न सोडवल्याबद्दलची ती शिक्षा असावी !

**ना. तु. दांडेकर** (मुंबई)

**प्रश्न—घोडचूक या शब्दाचा घोडा ह्या शब्दाशी कांहीं संबंध आहे काय ?**

**उत्तर**—खात्री नाहीं—पण गाढव ह्या शब्दाशी नक्की आहे !







अनुक्रमणिका

( पान ९ वरून चालू )

माझी सराईत नजर मागर्से हेरूं लागली तोंच वेटर शेजारी येऊन उभा राहिला आणि विचारूं लागला, " काय आणूं साहेब ? "

हे वेटर लोक मोठे विचित्र असतात. नको असतात तेव्हां पुढें पुढें करतात. लेकाचे असे वागतात कीं त्यांना वाटतं आम्ही माणसं केवळ खाण्यापिण्यासाठींच हॉटेलांत येतो. तरी बरं कीं हॉटेलांत चाललेले प्रकार बेटे उघड्या डोळ्यांनी पहात असतात. त्याच्याकडे दुर्लक्ष करून मी समुद्राकडे पाहूं लागलो. मला वाटलं कीं त्याच्याकडे लक्ष दिलं नाही म्हणजे तो पुढें सरकेल. पण मोठ्या चिकाटीनं त्यानं पुन्हा एकदां विचारलं, " काय आणूं साहेब ? "

आतां सुटका नाही हें ध्यानांत येऊन मी खिसे चांचपल्यासारखं केलं आणि म्हटलं, " एक चारमिनारचं पाकिट घेऊन ये—" मी ऑर्डर दिली आणि माझी चूक माझ्या ध्यानांत आली. मला कितीहि आवडत असली तरी आज चारमिनार ओढून चालणार नव्हती. रूपाला ह्या सिगारेटचा वास मुळींच आवडत नसे. तसं तिनं अनेक वेळां बोलून दाखवलं होतं. माझ्या सिगारेट ओढण्याला तिचा विरोध नव्हता. मी उंची ब्रॅन्डस् ओढावे एवढाच तिचा आग्रह होता. मी कॅप्स्टन किंवा गोल्डफ्लेक ओढलेली तिला चालत असे. चालत असे एवढंच नव्हे तर कॅप्स्टनचा फ्लेवर तिला विशेष आवडत असे. माझ्या ओठांत एकदां कॅप्स्टन असतांना ती म्हणाली होती, " ही सिगरेट कशी उबदार वाटते ! "

तिच्यापुढें पाकिट करीत मी विचारलं, " घेणार काय ? "

" उगाच चावटपणा करूं नको—"

" तूं आवड दाखवलीय म्हणून विचारलं. नाही म्हणतेस, राहिलं." आणि विचारलं, " तूं कधींच ओढली नाहींस काय ? "

" नाहीं—"

" मग एकदां ओढून पहा." आणि मी तिला आग्रह करूं लागलो. मी फारच आग्रह करूं लागलो तेव्हां ' आता नको—पुन्हां केव्हां-तरी ' असें म्हणून तिने तो विषय संपवला होता. ह्या गोष्टीची आठवण झाली तेव्हां मी चारमिनारचं पाकिट परत केलं आणि कॅप्स्टनचं मागवलं. आतां रूपा आली कीं पाकीटांतल्या दोन सिगारेटस् काढून त्या मी ओंठांत ठेवणार होतो. दोन्ही एकदम शिलगावणार होतो. धूर सोडून खात्री करून घेणार होतो आणि मग ओठातली एक सिगारेट काढून तिच्यापुढें करीत म्हणणार होतो, ' घे—अशा ठिकाणी आणि अशा वातावरणात तुझं सिगारेट ओढणं विशेष शोभून दिसेल. '

माझ्या भोवतालच्चं आजचं वातावरणच असं होतं कीं कुणी कांहीं केलं तरी ते खपून जाण्यासारखं होतं. इथं जमलेले सारे लोक मजा करायला आले होते. सहा दिवसांच्या कामानंतर आलेला हा विश्रांतीचा वार प्रत्येकानं भोगून घ्यायचं ठरवलेलं दिसत होतं. बाहेरच्या जगांत मोठ्या गंभीरपणानं वागणारी ही माणसं ह्या ठिकाणी थिल्लरपणानं वागत होती. जणूं हॉटेलमधें शिरतानाच त्यानी आपल्या मानेवरचं गंभीरपणाचं ओझं दरवाजाशीं उतरवून ठेवलं होतं. समाजातला आपला दर्जा आपला लौकिक किंवा आपलं वय ह्या गोष्टींचा प्रत्येकाला विसर पडला होता. एक विसरला



## मूर्ति लहान .. कीर्ति थो

# ❀ का ग द ❀

कागद म्हणजे संपादकांचा, लेखकांचा, सरकारी कर्मचाऱ्यांचा—साऱ्यांचाच प्राण आहे. विसाव्या शतकांत कागदासारखी महत्त्वाची आणि आवश्यक दुसरी वस्तु कोणतीच नाहीं. अशा या कागदाचा इतिहास मोठा मनोरंजक आहे.

इ. स. १०५ मध्यें चीनमध्यें पहिल्या प्रथम कागद तयार झाला. आतां चीन आणि भारत यांत कागदाचा प्रथम संशोधक कोण याबाबत अनेक मतभेद आहेत. अलेक्झांडरच्या सैन्याबरोबर आलेल्या ' निआर्कस ' यानें असें लिहून ठेवलें आहे कीं, हिंदु लोक रुई कुटून कागद करतात. कांहीं लोकांच्या मतें मुसलमानांनीं भारतांत कागद आणला असावा. परंतु आशिया खंडांत यार्कंद जवळील कुगिअर येथें पांचव्या शतकाच्या सुमारास जीं भारतीय गुप्त लिपींत लिहिलेलीं हस्तलिखितें सांपडलीं तीं भारतांतूनच तेथें गेलीं असावींत असा विद्वानांचा तर्क आहे. त्यामुळें मुसलमानांच्या आगमनापूर्वी भारतांत कागद तयार होत असावा असें मानण्यास जागा आहे.

युरोपमध्यें प्राचीन काळीं पापीरस नांवाच्या इजिप्तमधील एका झाडापासून तयार होणारा पदार्थ लेखनाकरितां वापरत. पेपर या इंग्रजी शब्दाची व्युत्पत्ति या शब्दापासूनच. हिंदुस्तानांत व मध्य आशियांत जुनें संस्कृत ग्रंथकार भूर्जपत्रावर लिहीत; पण भूर्जपत्र दमट हवेंत ३०० वर्षांहून अधिक काळ टिकत नाहीं. परंतु चीन आणि तुर्कस्तानमध्यें तिसऱ्या व चौथ्या शतकांतील भूर्जपत्रावरील हस्तलेख सांपडले आहेत. भारतांत सपाटीच्या प्रदेशांत व नेपाळांत ताडपत्रें वापरीत व त्यावर कोरून लिहिण्यासाठीं अणकुचीदार सळई वापरीत. या अक्षरांना काळा रंग येण्यासाठीं त्यावर काजळ फासत. आसामांतील मूळचे रहिवाशी झाडांच्या अंतर्सालीवर लिहीत. चीनमध्यें कागद तयार होण्यापूर्वी लिहिण्यासाठीं बांबूच्या सुबक पट्ट्यांचा उपयोग करीत चीन देशाचा प्राचीन इतिहास बांबूच्या सुबक पट्ट्यावर लिहिला होता, त्याचा एका लढाईत नाश झाला असें म्हणतात.

जपानमध्यें ६ व्या शतकापासून तुतीच्या झाडाच्या वाकाचा कागद तयार केला जाई. पण चीनमधील कागद तयार करण्याची कला जगाला ८ व्या शतकापर्यंत माहित नव्हती. इ. स. ७५१ मध्यें अरबांचें आधिपत्य समरकंद वर असतांना समरकंदवर चिन्यांनी हल्ला केला. तो हल्ला अरब सुभेदारानें परतवून लावला. व त्यावेळीं

अनुक्रमणिका

झालेल्या झटापटींत त्यानें अनेक चिनी सैनिक पकडले. त्यांतील कांहीं लोकांना कागद तयार करण्याची कला माहित होती. त्यांनी समरकंद येथें कागद तयार केला व पुढें ती कला सर्व अरबस्तानभर पसरली व तेथून युरोपांत गेली.

युरोपमध्यें प्रथमतः कागदाची कला स्पेनमध्यें माहित झाली त्यानंतर १०० वर्षांनी म्हणजे १५८८ सालीं इंग्लंडमध्यें केंटमधील डार्टफोर्ड येथें जॉन स्पिएलमन यानें कागदाचा कारखाना काढला. पण १६९० पर्यंत इंग्लंडमध्यें जाडा तपकीरी रंगाचा कागद तयार होत असे व पांढरा शुभ्र कागद फ्रान्समधून आयात होई. पुढें फ्रान्सशी युद्ध सुरू झाल्यावर इंग्लंडमध्यें पहिल्या प्रथम जेम्स व्हॉटमन यानें पांढरा कागद तयार केला.

भारतांत जुन्नरसारख्या ठिकाणीं हातकागदाचे कारखाने होते तरी बराचसा कागद १८४० पूर्वी चीनमधूनच भारतात येई. पण १८४१ नंतर भारतांत हातकागदाचे कारखाने अनेक निघाले. भारतांत रामपूर येथें कागदाची पहिली गिरणी निघाली. त्यानंतर बंगालमध्यें टीटाघर येथें कागदाचे मोठे कारखाने निघाले. वृत्तपत्रांना लागणारा कागद चीन, अमेरिका, इंग्लंड आणि हॉलंडमधून निर्यात होत असे. गेल्या वर्षापासून नेपा येथील गिरणींत वृत्तपत्रीय कागद तयार होऊं लागला आहे. पण अजूनहि त्याची प्रत पाश्चात्य कारखान्यांना टक्कर देणारी नाहीं हें निश्चित ! ※ *

---

म्हणून दुसरा विसरला आणि असें करतां करतां विसरणाऱ्यांची माळ पुरी झाली. पण ही माळ पुरी झाली म्हणूनच वातावरण हलूं लागले. त्याला गति आली. ते रंगू लागले. पाहता पाहता रंग पालटूं लागले. ह्या रंगीत, हलक्या आणि हलक्याफुलक्या वातावरणाकडे शेजारच्या समुद्राचे पाणीही ओढ घेऊं लागले. भरतीच्या लाटा पाहून कुणाला तरी पोहायला उतरायची स्फूर्ति झाली. आणि ह्या उत्साहाची लाट पाहता पाहता माझ्या शेजारच्या टेबलावर येऊन थडकली. प्रेयसीचे बोलणे ऐकून गुदगुल्या झाल्याप्रमाणें हंसणारा आणि बोलताना मधूनच तिच्या कमरेभोंवती हात टाकून तिला जवळ ओढून घेऊं पाहणारा शेजारच्या टेबलावरचा तरूण तिला म्हणूं लागला, " आपण पोहायला जाऊं "

त्याच्या ह्या बोलण्यावर तिचे अंग एकदम शहारले आणि त्याला जास्तच बिलगत ती म्हणाली, " नको ना-"

" अगं चल—अशी मजा येईल. "

" मला पाण्याची भिती वाटते "

" मी असल्यावर कसली भिती ? चल - चल. अशी संधी पुन्हा येणार नाहीं. "

त्याचे हे बोलणे मला फार आवडले. दुसऱ्याला साहसाला उद्युक्त करताना असेच बोलावे लागते. असाच पुढाकार घ्यावा लागतो. असेच आंजारून गोंजारून घ्यावे लागते आणि आश्वासने द्यावी लागतात. त्याच्या बोलण्यावर विसंबून ती त्याच्याबरोबर पाण्यात उतरायला तयार झाली तेव्हां मला एकदम रूपाची आठवण झाली. क्लबला येण्याविषयीं मी तिला आग्रह केला होता आणि 'नको बाई' करून ती माझ्या बेतात मोडता घालूं लागली तेव्हां अशीच आश्वासने देऊन मी तिला तयार केली होती. आता माझ्याशेजारी ती बसलेली असती तर मीही तिला म्हटलं असतं, 'आपणही पोहायला जाऊं.'

पण ती असती तर 'मी असं केलं असतं' किंवा 'असं म्हटलं असतं' असा विचार करण्यात काय अर्थ होता ? जिच्या जीवावर मी मनांतल्या मनांत उड्या मारीत होतो तिचा तर अजून पत्ताही नव्हता. ह्या बायका कधीं कधीं मोठ्या विचित्र वागतात. मनांत भरलेला पुरुष नादी लागेपर्यंत त्याच्यासाठीं जीव टाकतात. अशक्य गोष्टी चुटकीसरशी करून मोकळ्या होतात. आणि पुरुष कह्यात आला अशी खात्री झाली कीं त्याला खेळवत राहतात. हुलकावण्या देतात. भेटीची वेळ ठरवतात पण ठरल्यावेळीं येत नाहीत. ताटकळत ठेवतात. प्रेमाच्या डावातील ह्या मार्गाचा अवलंब करून रूपा आता मला किती वेळ ताटकळत ठेवणार होती ?—

असें खेळवून घेण्यांत आणि ताटकळत राहण्यातहि एका मर्यादे पर्यंत मजा असते. पण आजूबाजूचे प्रेमिक मजा करताना पाहून एकलेपणाची जाणीव होते. आणि एकदा ही जाणीव झाली कीं मर्यादेची कक्षा संकीर्ण होऊं लागते.

माझ्या भोंवतालच्या वातावरणाला आता चांगलीच गति आली आहे. बिलियर्ड टेबलाभोंवती चेंडूंची दंगल चालू आहे आणि चेष्टा-मस्करी करताना उठलेले हास्याचे फवारे साऱ्या वातावरणांत भरून राहिले आहेत. ज्यूक-बॉक्समधून बाहेर पडलेले संगीताचे सूर प्रत्येकाला वर उचलीत आहेत. पुन्हां अलगद खालीं आणून ठेवीत आहेत. खाली ठेवल्यावर एका जागीं स्थिर उभं राहूं न देतां गरगर फिरवीत आहेत. ह्या गरगर फिरण्याने आता प्रत्येकाला बेहोषी येऊं लागली आहे. आणि ह्या बेहोषीच्या शिंपल्यांत अधिकाधिक शिरायला मिळावं म्हणून प्रत्येकजण धडपडत आहे. ह्या धडपडीत सामील व्हायला उत्सुक असलेली छताला लटकलेली बल्ब्स आणि माळेला लटकलेल्या पताका खालच्या दिशेने झेपावण्यासाठीं पराकाष्ठा करीत आहेत. भरतीचे पाणी पाहून पोहायला धांवलेल्या प्रेमिकाना आता चेव आला आहे. पोहण्यापेक्षां जोडीजोडीने डुंबण्यांतले सुख हे रसिक लुटत आहेत. पोहण्याचा आविर्भाव करीत आहेत. एकमेकांशेजारीं सहज आल्याप्रमाणें येत आहेत. दूर होत आहेत. दूर झाल्यावर एकमेकांच्या अंगावर पाणी उडवीत आहेत. हंसत आहेत. आणि हंसता हंसता जवळ येऊन एकमेकाला मिठी मारीत आहेत. मिठीची गोडी विरण्यापूर्वीच दूर होत आहेत. पुन्हा ओढीने जवळ येत आहेत. आणि हें सारे पाहून पाण्याबाहेर काढलेल्या एखाद्या माशानें तडफडावे तसा रूपा जवळ येत नाहीं म्हणून मी तळमळत आहे. तिच्या वाटेकडे पुन्हा पुन्हा पहात आहे. निराश होत आहे. निराश झालेल्या नजरेंत आशेची धुकधुक आहे. आणि ही धुकधुक निराश झालेल्या नजरेला पुन्हा चाळवीत आहे. तिच्या वाटेकडे खेचत आहे. हें असे थांबणे, वाट पाहणे आणि निराश होणे असह्य होत आहे. जीव घेणे ठरत आहे. सारे आटोक्याबाहेर चालले आहे--






**सौ. विभावरी घाटे** ( कुर्ला )

**प्रश्न—मला लोकमान्य पुढारी होण्याचा रात्रंदिवस ध्यास लागला आहे. मार्ग दाखवाल का ?**

**उत्तर**--दुसरा एकादा चांगला ध्यास लावून घ्या--कारण लोकमान्य पुढाऱ्याच्या बाबतींत काय आहे कीं तुमच्या पुढारीपणाचा ध्यास लोकाना लागायला पाहिजे; पण तो लागलाय तुम्हाला तेव्हां ते कांहीं जमेल असं वाटत नाहीं. शिवाय सध्या समाजांत पुढाऱ्याची जागाही रिकामी नाहीं !

**सुरेश जुन्नर** ( नाशिक )

**प्रश्न—आप या पाठीमागे लोक आपल्याबद्दल काय बोलतात हें जर आपल्याला कळलें असतें तर--?**

**उत्तर**--आपलें नांव छापून यावे म्हणून तुम्हीं प्रश्न विचारता हें लोकांचें म्हणणें तुम्हांला मान्य करावे लागले असते.—

**म. त्रिं. वाडेकर** ( माटुंगा )

**प्रश्न—आपण घातलेल्या पाणपोईला पाणीपुरवठा कोठून होतो तें कृपा करून सांगाल काय ? आपणास जवळ असलेल्या समुद्रापासून म्हणावा तर इतकें गोड कसें ?**

**उत्तर**—आमच्या पाणपोईंत पाणी नाहीं—आहे तो निर्भेळ रस आणि त्या रसाच्या निर्मितीला कारणीभूत होतात ते आपल्यासारखे रसिक ! जेथें रस आणि रसिक यांचा मेळ बसतो तेथें गोडवा हमखास निर्माण होतो.

**श्रीकृष्ण पोळ** ( नासिक )

**प्रश्न--साहित्यिकांना उच्च ध्येय असावे असें सर्वजण सांगतात. हें उच्च म्हणजे काय ?**

**उत्तर**—तें असं उघड सांगितलं तर साहित्यिकांबरोबर असाहित्यिकांनाही कळेल म्हणून येथें सांगता येत नाहीं. माफ करा !

**शं. रा. खुळे** ( नागपूर )

**प्रश्न—ज्या भारतवर्षात पूर्वीं सोन्याचा धूर निघत होता तेथेंच आतां लाकडाच्या भुशाचा धूर निघत आहे ही उन्नती कीं अधोगति ?**

**उत्तर**—पूर्वीं फक्त सोन्याचाच धूर निघत असेल .पण आतां घरांतून लाकडाचा गिरणींतून कोळशाचा, स्टेशनवर इंजिनचा आणि तोंडांतून सिगरेटचा इतके धूर निघत आहेत. ही विविधता पूर्वीं होती कां ? मग याला अधोगति कसें म्हणतां येईल ? विविधता म्हणजे संपन्नता नव्हे काय ?

**अनंत पासीलकर** ( मुंबई )

**प्रश्न--स्वर्गात काव्य आहे आणि पृथ्वीवर विनोद आहे असं मार्क ट्वेननें म्हटलें आहे. खरोखरच पृथ्वीवर काव्य नाहीं काय ?**

**उत्तर**—मार्क ट्वेन पृथ्वीवर होता त्यावेळीं काव्य स्वर्गात असावे, पण आतां मार्क ट्वेन स्वर्गात असल्यामुळें काव्य पृथ्वीवरच आहे आणि विनोद कधींच स्वर्गवासी होत नाहीं !

**र. प. घाटे** ( नागपूर )

**प्रश्न--मराठींत आघाडीवरचे तरुण विनोदी लेखक अजून उत्पन्नच व्हायचे आहेत यावर आपलें काय मत आहे ?**

**उत्तर**—आमचें मत असें आहे कीं ते केव्हांच उत्पन्न झालेले आहेत पण आपण आघाडी म्हणून पिछाडीला पाहूं लागलों तर ते आपल्याला कसे दिसणार ? थोडी मान उंच करून तुम्ही पुढें आघाडीवर पाहिले तर तुमचे मत अचूक नाहीं हें तुम्हालाच कळून येईल.

**करंदीकर**, मुंबई.

**प्रश्न—स्त्रीचं अचूक वय कसं ओळखावं ?**

नव्या वर्षाचे नवे बेत : नवकवि



नव्या तऱ्हेने लिहिणार !

**उत्तर**—आम्ही तुम्हाला पाहिजे तर झाडावरील पानांची संख्या अचूक कशी ओळखावी किंवा चौपाटीवर पडलेल्या कागदांची संख्या बिनचूक कशी मोजावी अथवा आकाशांतील ताऱ्यांची संख्या न चुकतां कशी सांगावी हें सांगतों पण स्त्रीचं अचूक वय कसं ओळखावं हें सांगणं अशक्य आहे--अहो जें नेहमींच चूक असतं ते अचूक कसं असेल ?

**शं. रा. काळकुंद्रीकर** ( बेळगांव )

**प्रश्न—सगळेच संपादक दिवाळी अंक कां काढतात ?**

**उत्तर**—एक तर संपादकांना काढतां येण्यासारख्या गोष्टी दोनच—कर्ज आणि अंक; तेव्हां कर्जापेक्षां अंक बरा ! दुसरी गोष्ट म्हणजे सगळेच दिवाळी अंक काढीत नाहींत, कांहींजण दिवाळें अंक काढतात !

**शाम मोटघरे** ( कल्याण )

**प्रश्न—आज मराठी नाट्यसृष्टींत अराजक माजले आहे काय ? पुन्हा 'रामराज्य' कसें करता येईल ?**

**उत्तर**—कुणी तरी तुम्हाला थाप मारलेली दिसते. डझनानं नाटकं होताहेत, लोक मजेनं पाहताहेत, वर्तमानपत्रं लिहिताहेत—असं कां कुठं अराजक असतं ? नाटकांतही रामराज्य कशाला आणता ? तसं म्हणाल तर मराठी नाटकाची सुरुवातच 'रामराज्य वियोगा'नं झाली आहे ! नाटकांत 'राम' असला की पुरे आहे. त्याचं राज्य कशाला ?

**वा. पु. नेते** ( सावळज )

**प्रश्न—पूर्वीं सर्वसाधारणपणें आई हे दैवत असे; पण आतां पत्नी हे आहे—असें कां ?**

**उत्तर**--पूर्वीं लोक आदर्शवादी होते; आतां व्यवहारवादी आहेत.

**का. के. मणियार** ( वाळुंज )

**प्रश्न--मी एका सरकारी कार्यालयांत संडासावर पाहिलेली पाटी अशी होती 'शौचालय ( मर्द )'—आपले काय म्हणणें आहे ?**

**उत्तर**--शौच मंदिराचा उपमर्द !

**मा. तु. लंके** ( दहिवडी )

**प्रश्न—मनुष्य प्रेमासाठीं सर्वस्व द्यायला तयार होतो म्हणजे काय ?**

**उत्तर**--आजच्या काळांत सर्वस्व म्हणजे खिशांतील आठबारा आण्याची चिल्लर ! ••



अनुक्रमणिका




• कथासम्राट चेकॉव्ह • बंगलोर काँग्रेस • मुंबई येथील शास्त्रीय परिषद • मद्रासला गाडी मूळपदावर • प्रतिवार्षिक प्रदर्शन—एक कटाक्ष • रंगलेली मैफल • व्होरोशिलॉव आणि ईश्वर

२६ जानेवारी हा आपला प्रजासत्ताक दिन. आपण तो मोठ्या उत्साहानें आणि अहंतेने साजरा करतों. स्वातंत्र्यांतील गेल्या एक तपाचें सिंहावलोकन केलें, तर सुरवातीला जे महान राक्षसी प्रश्न आमच्याकडे आ वासून पाहात उभे होते त्या सगळ्यांचा तो 'आ'कार अधीक विस्तारलेला आम्हांला दिसेल. सामान्य माणसें तर दिवसेंदिवस अधिक हैराण होतच आहेत, परंतु 'मॅगलँथ टॉमस जोसेफ' या विज्ञान शास्त्रांतील अत्यूच्च पदवीधरांना, प्रपंचांतील अपुऱ्या आवकीला कंटाळून आत्महत्त्या करावी लागत आहे. ज्या घटनेमुळें आमच्या पंत प्रधानांनाहि अत्यंत वाईट वाटलें. आणि त्यांनीं 'फारच दुःखदायक' असे उद्‌गार काढले. यापुढें तरी अशा दुःखदायक घटनांचा अंत होवो आणि या पुढचे प्रजासत्ताक दिन 'सुजलाम्, सुफलम्, शीतलम् असे दिवस पाहो, अशीच याप्रसंगीं प्रार्थना करतों.

## साहित्य

### कथासम्राट चेकॉव्ह

जानेवारी महिन्याच्या १७ तारखेस जगांतील प्रत्येक सुसंस्कृत राष्ट्रांत रशियाचा थोर कथालेखक ॲन्टन चेकॉव्ह यांची जन्मशताब्दि मोठ्या श्रद्धेनें साजरी झाली. (जुनें वाङ्मय) असा पाठभेद करणाऱ्या आमच्या मराठी साहित्यिकांना पाउणशें वर्षे लोटलीं तरी चेकॉव्हसारखा लेखक आणि त्याचें थोर, नेहमीच चिरतरुण आणि नाविन्यानें रसरसलेलें वाङ्मय हें एकापरीनें उत्तरच आहे. श्रेष्ठ वाङ्मय, भाषा, प्रांत आणि 'इझम'च्या सरहद्दी ओलांडून जनमनाच्या हृदयांत कायमचें ठाण मांडून कसें वसतें याचें अविस्मरणीय उदाहरण म्हणजे चेकॉव्हचें नितांतमधुर आणि सामाजिक सुखदुःखाला वाचा फोडणारें कथालेखन. शेक्सपीयरच्या खालोखाल ज्याचें वाङ्मय देशोदेशीं आवडीनें वाचले गेलें आणि जातें असा चेकॉव्ह हा एक शारदेच्या प्रांगणांतील आघाडीचा मोहरा. चेकॉव्हचें आयुष्य म्हणजे एक हृद्य भ्रमणगाथा आहे. आणि यांतून त्यानें समाजाच्या खालच्या थरांतील माणसांच्या अंतःकरणांतील संवेदना टिपल्या आणि त्या बोलक्या केल्या आणि त्यामुळें त्याचें कथालेखन आणि नाट्यलेखन हें अतिशय लोकप्रिय झालें. वाङ्मयाचें संयोजन करणारे रशियन कम्युनिस्टहि या बेबन्द जीवन जगणाऱ्या बेफाट साहित्यिकाची जन्मतिथि साजरी करण्यांत भाग घेतात ही एका परीनें वैचित्र्यपूर्ण घटनाच, चेकॉव्हसारख्या थोर लेखकानें शेवटीं भविष्यकाळावरहि कशी मात केली याचें उत्तम हें उदाहरण.

—पिनाकी

## राजकारण

### बंगलोर काँग्रेस

बंगलोर काँग्रेसच्या निमित्तानें निघालेल्या 'साव्हनीर'मध्यें पं. नेहरूंचा एक संदेश प्रारंभी छापण्यांत आला आहे. या संदेशांत नेहरूंनीं प्रत्येक काँग्रेस अधिवेशनाला ऐतिहासिक अधिवेशन म्हणून गौरविण्याच्या प्रथेचा निर्देश केला आहे. त्यामानानें आतांपर्यंतच्या काँग्रेसच्या अधिवेशनांशीं तुलना करतां बंगलोर काँग्रेस हे 'ऐतिहासिक अधिवेशन' मानतां येणार नाहीं. याखेपेस प्रेक्षकांची गर्दी कमी होती आणि खुल्या अधिवेशनांत ठरावांचा पसारा फारसा नव्हताच.

दुसरं महत्त्वाचं कारण म्हणजे गेल्या चार-पांच वर्षांच्या कालखंडांत काँग्रेसपक्षाच्या लोकप्रियतेला लागलेली उतरती कळा. आज हा पक्ष देशांतील एक बलाढ्य पक्ष म्हणून वावरत असला तरी या पक्षाची पूर्वीची ताकद आणि सामर्थ्य ओसरलें आहे. कांहीं राज्यांत तर काँग्रेसचें प्रभुत्व नष्ट झालें आहे आणि इतर पक्षांच्या सहकार्यावर काँग्रेसला सत्तेचें राजकारण खेळावें लागत आहे. आणि अशा परिस्थितींत काँग्रेसच्या या अपयशाची तात्विक मीमांसा करून त्यानी कारणें शोधून काढून त्यावर इलाज करण्याच्या दृष्टीनें कांहीं विधायक सूचना या अधिवेशनांत मांडल्या जाणें आवश्यक होतें. पण अधिवेशनांत पास झालेले ठराव पाहातां अशा प्रकारचा वास्तववादी दृष्टीकोन कांग्रेसजनांनीं घेतलेला दिसत नाहीं.

या अधिवेशनांत आणखी एक गोष्ट ठळकपणें प्रत्ययाला आली आणि ती म्हणजे पं. नेहरूंच्या व्यक्तिमत्वाचा असामान्य प्रभाव,

अधिवेशनांतील महत्त्वाचा ठराव म्हणजे परराष्ट्रीय धोरणाबाबतचा. स्वातंत्र्यानंतर भरत आलेल्या प्रत्येक कॉंग्रेस अधिवेशनांत परराष्ट्रीय धोरणाच्या ठरावाला दुय्यम स्थान मिळालें आहे. कारण पंतप्रधान या नात्यानें ह्या ठरावाची पार्श्वभूमि आणि त्याचें समर्थन पार्लमेंटमध्यें आणि जाहीर व्याख्यानांत पं. नेहरूंनीं असंख्य वेळां जनतेसमोर मांडलें असल्यामुळें अधिवेशनांतील तद्विषयक ठरावांत आणि त्यांवरील भाषणांत नावीन्य राहात नाहीं.

आर्थिक धोरणाचा ठराव समाधानकारक आहे. मात्र ठराव बराचसा सरकारला अनुलक्षून होता. भारताची आर्थिक प्रगति व्हावी तेवढ्या जलद रीतीनें झालेली नाहीं आणि धोरण आणि अंमलबजावणी यांत बरीच तफावत आढळतें हें स्पष्टपणें कबूल करण्यांत आलें. शिवाय या ठरावाद्वारें प्रत्येक "कॉंग्रेसपक्षानें सहकारी सेवा संघ आणि पंचायत या चळवळीशीं निगडित राहिलें पाहिजे आणि शिवाय ग्रामीण विकासाच्या कोणत्या ना कोणत्या कार्यक्रमाशीं त्यानें निकट संबंध राखला पाहिजे.' असाहि आदेश देण्यांत आला.

कॉंग्रेस अध्यक्षांच्या भाषणांत फारसें नावीन्य अगर नवे आदेश नव्हते. नियोजनाच्या आवश्यकतेवर त्यांनीं आपल्या भाषणांत भर दिला तसेंच राष्ट्रीय उद्योगधंदे आणि खाजगी उद्योगधंदे यांत अनिष्ट स्पर्धा नसावी असें मत व्यक्त केलें. तसेंच उद्योगधंद्याच्या वाढीबरोबर शेतीच्या विकासाची वाटचाल आंखली पाहिजे असें मत त्यांनीं व्यक्त केलें. चीनचें आक्रमण थोपवलें पाहिजे पण चीनच्या तथाकथित आक्रमणानें पंचशीलचा भंग झाला नाहीं असेंहि मत त्यांनी व्यक्त केलें. मात्र भाषिक प्रश्नाबाबत संजीव रेड्डी पं. नेहरूंच्या मार्गाहून थोडा भिन्न मार्ग चोखाळूं इच्छितात. हिंदी भाषेबरोबर इंग्रजीहि चालू ठेवावी आणि या भाषिक बदलामुळें ज्यांची गैरसोय होणार आहे त्यांना सोयीस्कर वाटेल तेव्हांच हा बदल घडवून आणावा असे विचार त्यांनी मांडले.

कम्युनिस्टांच्या चीनविषयक धोरणाचा समाचार घेतांना ते म्हणाले कीं आम्हीं आमच्या सरहद्दीबाबतच जागृत राहिले पाहिजे असें नसून प्रत्येक शहर आणि खेडे याठिकाणीं सावध राहिलें पाहिजे. घातपात आणि पंचमस्तंभी कारवायांना वेळींच आळा घातला पाहिजे.

कॉंग्रेसमध्यें कांहीं जातीय प्रवृत्ति आहेत हें त्यांनी कबूल केलें.

संजीव रेड्डी यांचें हें भाषण एका अर्थी निराशाजनक झालें. कॉंग्रेसप्रणित समाजवादाचा ते नवा अर्थ मांडतील, आवडीच्या ठरावातील संदिग्धता उलगडून दाखविणारें अभ्यासी भाषण करतील अशी ज्यांची अपेक्षा होती त्यांची सपशेल निराशा झाली.

—विष्णुशर्मा

## शास्त्रकारण

### (१) मुंबई येथील शास्त्रीय परिषद

इंडियन सायन्स कॉंग्रेसचें ४७ वे अधिवेशन मुंबई येथे गेल्या महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत मोठ्या थाटानें पार पडले. अधिवेशनाचें उद्घाटन पंतप्रधान पंडीत जवाहरलाल नेहरू ह्यांच्या शुभहस्ते झाले. अधिवेशनास परराष्ट्रीय शास्त्रज्ञ खास निमंत्रणावरून हजर होते. मुंबई विद्यापिठाकडे अधिवेशनाचें यजमानपद होते.

परिषदेला जवळजवळ तीन हजार प्रतिनिधी येतात. त्याचप्रमाणें कांहीं ख्यातनाम शास्त्रज्ञहि आपली उपस्थिती देतात. ह्या सर्वांची योग्य व्यवस्था ठेवणें हें काम दगदगीचें व किचकट आहे. त्यामुळें स्थानिक




कार्यकर्त्यांची बहुतेक शक्ति ह्या कार्यासाठींच खर्ची पडते. सहाजिकच मुख्य कामाकडे दुर्लक्ष होतें किंवा गैरव्यवस्था होते हा सर्व प्रकार टाळण्यासाठीं परिषदेला आटोपशीर स्वरूप देणें आवश्यक आहे. त्यासाठीं प्रथम विषयांची योग्य वाटणी करून, त्या प्रत्येक गटाचें वेगळें अधिवेशन भरवावें. ह्या दृष्टीनें, प्राणिशास्त्रज्ञांची एक वेगळी परिषद जबलपूर येथें होऊन सुरवात झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मेडिकल परिषद वेगळी भरते, त्या ठिकाणीं शरीरशास्त्राचा भाग जाणेंच योग्य आहे. तैत्सच परिषदेबरोबरच मानसशास्त्रीचा एक भाग असतो त्यामुळें सायन्स कॉंग्रेसच्या अधिवेशनांत मानसशास्त्राचा भाग असण्याचें प्रयोजनच उरत नाहीं.

१९५९ सालीं चार्लस डार्विन ह्यांच्या ग्रंथ प्रकाशनाची शंभर वर्षे झालीं. त्या संबंधीचें कार्यक्रम व चर्चा साऱ्या जगभर झाल्या. त्या निमित्तानें ह्या अधिवेशनांत "विकासवादाची गेली शंभर वर्षें व त्याचे भवितव्य" अशा विषयावर एखादा परिसंवाद होईल अशी माझी अपेक्षा होती. शास्त्रीय परिषदेनें ह्या गोष्टीची दखल सुद्धां घेऊं नये हें आश्चर्य आहे.

अधिवेशनास नोबेल पारितोषक विजेते व वैज्ञानिक प्रा. नील बोर, पेनिसिलिनचा शोध लावणारे सर फ्लोरे, विख्यात वैज्ञानिक प्रा. गॅमो, अनुवंशशास्त्र तज्ञ डॉ. डॉबझेन्सकी हे होते. त्याशिवाय रशिया, जर्मनी, युगोस्लाव्हिया, बल्गेरिया, फ्रान्स इत्यादि देशांचें प्रतिनिधीहि हजर होते.

अधिवेशनाचें अध्यक्ष उत्कल विद्यापीठाचें उपकुल पति, व वनस्पतिशास्त्रज्ञ प्रा. परिजा हे होते. त्यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात समाजाच्या शास्त्रीय प्रगतिवर होणारा परिणाम विशद करून सांगितला. परिषदेच्या निमित्तानें शास्त्रीय उपकरणांचें एक प्रदर्शन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स व एल्फिन्स्टन कॉलेज येथें भरविण्यांत आले होते. प्रदर्शनाचें उद्घाटन रविवार दि. ३ जानेवारी रोजीं मुख्य प्रधान यशवंतराव चव्हाण ह्यांचे हस्ते झाले.

विद्यापिठानें प्रा. नील बोर ह्यांना सन्माननीय पदवी देऊन त्यांचा गौरव केला. बोर

या महिन्यातील माननीय व्यक्ति

## संजीव रेड्डी

पारतंत्र्याच्या काळांत काँग्रेसच्या अध्यक्षपदाची माळ गळ्यांत पडणं म्हणजे काँग्रेस कार्यकर्त्यांच्या तपश्चर्येचं महान् फलित मानलें जाई. विधायक कार्याची परंपरा, जनतेंतील अमाप लोकप्रियता, सर्वप्रांतीयाचें मनःपूर्वक पाठबळ आणि परकी राजसत्तेशीं झुंजार टक्कर देण्याला योग्य असें प्रभावी व्यक्तिमत्व, एवढी पुण्याई असल्याशिवाय देशातील या तत्कालीन एकमेव लोकप्रिय आणि बलशाली पक्षाच्या नेतेपणाची जबाबदारी राहण्याची संधि मिळणें दुर्लभ असे.



आज स्वतंत्र भारतांत काँग्रेसमधील गुणी आणि कर्तृत्ववान माणसें शासन आणि पक्षीय राजकारण यांत विभागली गेलीं. साहाजिक शासनाची जबाबदारी अवघड असल्यामुळें राजेन्द्रप्रसाद पं. नेहरूंसारखे जुने आणि जाणते शासनांत गुरफटले गेले. आणि या लोकोत्तर पुढाऱ्यांच्या गैरहजेरीमुळें दुय्यम दर्जाच्या पुढाऱ्यांना पक्षाच नेतृत्व सांभाळावें लागलं.

त्यामुळें ढेबर, इंदिरा गांधी आणि त्यानंतर संजीव रेड्डी अशी उतरत्या श्रेणीच्या व्यक्तींची मालिका अध्यक्षपदांच्या नामावळींत दिसते त्याला नाईलाज आहे.

तरीपण संजीव रेड्डी यांची एक विधायक आणि निस्वार्थी कार्यकर्ता म्हणून ख्याति कांहीं कमी नाहीं. १९ मे १९१३ सालीं त्यांचा जन्म झाला. उच्च शिक्षण अड्यार आर्टस् कॉलेजमध्यें पूर्ण केल्यावर १९३६ पासून ते काँग्रेसच्या चळवळींत पडले. मनमिळाऊ आणि गोड स्वभाव आणि संघटन कुशलता यामुळें १९३६ ते १९४६ पर्यंत सतत दहा वर्षे आंध्रप्रदेश काँग्रेस कमिटीच्या सेक्रेटरीपदाची जबाबदारी त्यांना सांभाळावी लागली. १९४६ मध्यें अनंतपूर मतदार संघानें प्रचंड मतसंख्येनें त्यांना आमदारकी बहाल केली. मद्रास काँग्रेस विधिमंडळाचें चिटणीसपदहि त्यामुळें त्यांच्या गळ्यांत पडलें. पुढें १९४७ मध्यें त्यांना मिनीस्टर फॉर प्रोहिबिशन, हाऊसिंग, अँड फॉरेस्ट म्हणून नियुक्त करण्यांत आलें. एप्रिल १९४९ पर्यंत त्यांनी मंत्रिपदाची धुरा चांगलीच सांभाळली. आणि जनतेचा विश्वास संपादन केला. पण त्यांच्यासारखा धडाडीचा कार्यकर्ता शासन व्यवहारांत गुंतल्यामुळें काँग्रेस श्रेष्ठींच्या सूचनेनुसार त्यांनी मंत्रिपदाचा त्याग केला आणि १९५१ पर्यंत आंध्रप्रदेश काँग्रेस कमिटींत नवचैतन्य आणण्याचें फार मोठें काम केलें. या काळांत त्यांच्या या निष्ठावान काँग्रेसकार्याचा गौरव म्हणून त्यांना काँग्रेस वर्किंग कमिटीतर्फे दाखल करून घेण्यांत आलें तें आवाडी काँग्रेसपर्यंत. १९५२ मध्यें एका पोटनिवडणुकींत राज्यसभेंत निवडले गेले. १९५३ मध्यें त्यांची आंध्र-काँग्रेस विधिमंडळाचे नेते म्हणून एकमतानें निवड झाली. आणि १ ऑक्टोबर १९५३ मध्यें आंध्राचे पहिले उपमुख्यमंत्रि म्हणून त्यांची निवड झाली. पुनरपि १९५५ मध्येंहि ते कलहस्ती मतदार संघांतून विधानसभेवर निवडून गेले आणि परत आंध्राचे उपमुख्यमंत्रि म्हणून त्यांची नेमणूक झाली आणि गोपाला रेड्डी यांच्या नंतर त्यांनीं मुख्यमंत्रिपदाची सूत्रें हातीं घेतली.

एक यशस्वी आणि कर्तबगार मुख्यमंत्रि म्हणून संजीव रेड्डी यांचा लौकिक, आणि त्यामुळेंच काँग्रेस अध्यक्षपदाची जबाबदारी त्यांचेवर पडली. बंगलोर काँग्रेसमध्यें त्यांनी देदिप्यमान असें कार्य केलें नसलें तरी त्यांनी आपली अध्यक्षीय जबाबदारी योग्य तऱ्हेनें पार पडली यांत शंकाच नाहीं. आतां पक्षीय राजकारणाच्या दृष्टीनें आणीबाणीच्या काळांतच त्यांची कसोटी आहे हें निश्चित. • •

सारख्या आंतरराष्ट्रीय कीर्तिच्या वैज्ञानिकांचा गौरव करण्यांत विद्यापीठानें औचित्य दाखविलें हे खरोखरीच चांगले झाले. नील बोर, प्रा. गॅमो, डॉ. डॉब झे न्स्की, डॉ. भाभा, इत्यादि शास्त्रज्ञांची भाषणें ठेवण्यात आली होती. त्यावेळीं अर्थातच शास्त्रांशी संबंध असणारे फारच थोडे लोक हजर होते. परंतु ही व्याख्यानें मुख्यतः त्यांच्यासाटीं होतीं. आपल्याकडे अजून व्हावी तितकी जागृति ह्या बाबतींत झालेली नाहीं असे खेदानें म्हणावें लागते.

निरनिराळ्या ठिकाणाहून आलेल्या प्रतिनिधींना अणूशक्ति केंद्र, पिंपरी येथील पेनिसिलिनचा कारखाना, व पुण्याची नॅशनल केमिकल लॅबोरेटोरी दाखविण्याची उत्तम व्यवस्था करण्यांत आली होती. त्याचा फायदा अनेकांनी घेतला.

अधिवेशनांत वेगवेगळ्या विषयांवर चर्चाहि झाल्या त्याशिवाय मुंबई महापालिकेने जमलेल्या प्रतिनिधींना चहा देऊन त्यांचा सन्मान केला.

पुंढील वर्षी हे अधिवेशन सरकी येथे होणार आहे.

**— सोविरा**

## क्रीडा

### मद्रासला गाडी मूळपदावर

मद्रासच्या चौथ्या कसोटी सामन्यांत पराभवानें कानपूर आणि मुंबईंतील कर्तबगारीवर पाणी फिरवलें ! कानपूरपासून चढत चाललेल्या उत्साहाला बेनॉनें सणसणीत फटका देऊन खालीं आणलें !... रामचंदनें पुन्हां एकदां टॉस जिंकला कीं बस्स--मग कानपूरप्रमाणें खराब होत जाणाऱ्या पिचवर आपला जसू पटेल लागू पडेल—आणि मग ?...पण भोळ्या मनाच्या ह्या स्वप्नांत बेनॉनें टॉस जिंकून मुळांतच निकाल लावला. क्रिकेटमध्यें असल्या स्वप्नांना अर्थ नसतो. तिथें अघटित तेंच घडण्याची शक्यता बाळगून राहावें लागतें. हा खेळ आहे, आणि तोहि क्रिकेट. इथें नुसतेच विजय होत नाहींत—विजयाप्रमाणेंच पराभवालाहि तयार रहावें लागतें. आपणाला तर असल्या पराभवांची चांगली संवय आहे. पराभवानें बिथरून जायचें आणि 'अगदीं खलास' व्हायचें सध्यां तरी कांहीं कारण नाहीं.

कानपूरला आम्हीं जिंकली, आणि मुंबईला लढत दिली; पण ही कर्तबगारीहि अपुऱ्या, तटपुंज्या सामर्थ्यावरच आधारलेली होती. म्हणूनच त्याचा विशेष अभिमान वाटला. फलंदाजी, गोलंदाजी, क्षेत्ररक्षण, यष्टिरक्षण, संघवृत्ति आणि नेतृत्व...सर्वच बाबतींत आपण कमकुवत आहोंत हें इतक्या लवकर विसरून भागणार नाहीं आणि आपली गाठ आहे ती यांतील जवळजवळ सर्व बाबतींत संपन्न असलेल्या आणि त्यांतूनच येणाऱ्या सदाविजयी मनोवृत्तीनें जास्तच सामर्थ्यशाली बनलेल्या ऑस्ट्रेलियन संघाशीं. अशा ह्या संघाविरुद्ध अपुऱ्या सामर्थ्यावर कानपूरला आमच्या संघानें गाठलेली मर्यादा फारच उंच होती. मद्रासला एवढेंच झालें कीं अनुकूल परिस्थिति प्राप्त झाल्याबरोबर ऑस्ट्रेलियानें आमचें मूळ ठिकाण दाखवून दिलें. जिथें अनेक वर्षें आपण गटांगळ्या खात आहोंत आणि जिथून पायाशुद्ध बांधणीनें चढत चढत वर यायचें तें ठिकाण. कानपूरच्या विजयानें किंवा मुंबईच्या लढतीनें आपल्या क्रिकेटला अर्थ आला, आणि मद्रासच्या पराभवानें तो अर्थ गेलीं अनेक वर्षें कां नाहींसा झाला होता, तें दाखवून दिलें.

कानपूरच्या एका विजयानंतर कित्येकजण म्हणत होते, "बस्स बस्स—आतां तिन्ही सामन्यांत अगदीं सपशेल पराभव झाला तरी हरकत नाहीं !" पण प्रत्यक्षांत तसें होत नाही. मद्रासच्या पराभवानंतर तींच माणसें हवालदिल झालेलीं दिसतात. विजयाची तहान ही अशीच आहे. तो दुरापास्त असतो तोंपर्यंत एखादा मिळाला तरी चालेल, अशी अगतिक भावना होते. पण तो एकदां मिळाला कीं आणखीन आणखींन हवासा वाटतो. आपली ताकद पाहण्याचेंहि भान मग रहात नाहीं. हीहि खेळाची एक गंमत आहे !

मद्रासच्या सगळ्या काळोखांत विजेच्या फेरीसारखी चमकून गेलेली कुंदरामची बॅट हें सळसळत्या रक्ताचें प्रतीक आहे. अशीं तेज माणसें अकालीं वृद्ध झालेल्या आमच्या अनेक क्रिकेटपटूंना आवडणार नाहींत. पण जिंकण्याची ईर्षा ह्याच जिवंत रक्तांत असते. असल्या बहादुरांनीं आणलेला पराभवसुद्धां वैभवशाली असतो. पण ही भाषा अनेकांना पटणार नाहीं. कारण पराभव गौरवशालीं असूं शकतो, हेंच त्यांच्या कल्पनेंत बसत नाहीं. पण ही चूक काळाची आहे. सगळा काळच बदलला आहे. नाहीं तर इंग्लंडविरुद्ध परवां वेस्ट इंडिजचा तडाखेबंद वॉरेलसुद्धां असा दोन-दोन दिवस रडत रखडत कां खेळला असता ? म्हणूनच म्हणतां, काळ बदलला हेंच खरें. दिवसभरांत जेथें चार-चारशें धांवा निघायच्या तिथें शंभर धावासुद्धां निघणें मुश्किल झालें आहे. आणि तरीहिं त्याचा कंटाळा येत नाहीं, तें लाजिरवाणें वाटत नाहीं. अशा या अकालीं म्हाताऱ्या झालेल्या काळांत कुंदराम वगैरे लोकांना वाव मिळतो हेंच नशीब म्हणायचें ! —कुंदराम जिते रहो पठ्ठे !

—**तिरंदाज**

## सत्यं शिवं सुंदरम्

### प्रतिवार्षिक प्रदर्शन, एक कटाक्ष

बॉम्बे आर्ट सोसायटीच्या प्रतिवार्षिक प्रदर्शनाचें उद्‌घाटन गेल्या वर्षीच्या एकोणतीस डिसेंबरला झालें. सोसायटीच्या अध्वर्युंनीं या खेपेला जें परिक्षक मंडळ नेमलें होतें, त्यांच्याबद्दल चित्रकला जगतांत एक मोठें कुतूहलजन्य वर्तुळ निर्माण झालें होतें. सालाबादपेक्षां हें नवें मंडळ कांहीं तरी निराळें करून स्वतःबद्दल थोडीबहुत सनसनाटी उत्पन्न करील असें वाटलें होतें; परंतु निराळें असें कांहींच घडलें नाहीं. अंदाजाप्रमाणें यावर्षीचें सुवर्णपदक श्री. बाबुराव सडवेलकर यांस त्यांच्या 'कॉस्मिक स्टेशन' या 'भयंकर' चित्राला मिळालें. बाकीचीं पदकें अशींच 'योग्यतेप्रमाणें' वांटलीं गेलीं.

हें प्रदर्शन म्हणजे दांभिकपणाचा एक रटाळ नमुना होता. अगदीं स्पष्टच सांगायचें झाल्यास या वर्षीचीं बक्षिसें, उत्कृष्ट अनुकरणबाजांना मिळालीं. पोरकटांच्या समुदायांत वाट चुकून एखादा महामहोपाध्याय अडकावा, कांहींसें तसेंच एखादें दुसरें पसंत आणि प्रौढ असें चित्र आपलें अस्तित्व जाहीर करायला हळूच डोकें वर काढी; परंतु तें बिचारें !

शिल्प विभागांत 'राघव कानेरिया' याचे 'वासरू' हें शिल्प थोडेंसे आनंददायक होतें. 'कांहीं कांहीं पोर्ट्रेट्स तर इतक्या भिकार दर्जाचीं होतीं कीं तीं या प्रदर्शनांत टांगलीं गेलेलीं पाहून कींव आल्यावांचून राहिलीं नाहीं. असें हें दिशाभूल करणारें लक्तरांचें, भेसळ आणि कसलीच अभिव्यक्ति नसलेले प्रदर्शन.

### संगीत

गेल्या महिन्यांत ऐकलेल्या अनेक कार्यक्रमांतून एका चांगल्या कार्यक्रमाची निवड करायची झाल्यास बालमोहन विद्यामंदिरांत झालेल्या 'यशवंत बी. जोशी' यांच्या गायनाची केली पाहिजे. ग्वाल्हेर घराण्याच्या शुद्ध आणि चिवट गायकीचें दर्शन जो[illegible] बुवांच्या गाण्यांत घडलें. बुवानीं के[illegible] जयजयवंती आदि राग उत्कृष्ट पद्धतीनें गायले. अस्ताईची मांडणी उत्तम, विलंपतीची तऱ्हा आकर्षक आणि मेहनतीनें गळ्याला बरहुकूम फिरतीची संवयहि चांगली लावलेली आहे. बुवांचा आवाज पातळ असून तारसप्तकांतील धैवतापर्यंत सहज लागतो. थोडासा 'नजाकतीचा' मसाला असावा असें मात्र राहून राहून वाटतें; प[illegible] तें बुवांच्या मर्जीवर सोंपवावें हेंच बरें !

—**गोपालन्**

## विनाकारण

### व्होरोशिलॉव आणि ईश्वर

नवी दिल्ली, ता. २१ :— (लो. वा.) प्रदर्शनांतील एक मोठें मक्याचें कणीस पाहून व्होरोशिलॉव यांनीं एक रशियन म्हण उच्चारली. 'ईश्वराच्या प्रेरणेशिवाय आपण आपलें बोटहि हालवूं शकत नाहीं' असा तिचा अर्थ आहे. त्यांची ती म्हण ऐकून व्होरोशिलॉव यांचा ईश्वरावर विश्वास असल्याचें पाहून कांहींना आश्चर्य वाटलें, तेव्हां त्यांच्या परिवारांतील एकानें 'त्यांनीं केवळ म्हण सांगितली' असा खुलासा केला.








# शेवटचें पान

दीपावलींचें हें शेवटचें पान वाचकांसाठींच राखून ठेवलें आहे. दीपावलींत प्रसिद्ध होणाऱ्या मजकुरांबाबत वाचकांच्या काय प्रतिक्रिया आहेत जाणण्यासाठीं दीपावली सदैव उत्सुक आहे. पत्रें सुटसुटीत छोटी असावींत. त्यांत वैयक्तिक गाऱ्हाणें नसावें. टोपण नांवाखालीं कोणतेंच पत्र प्रसिद्ध होणार नाहीं.

---

संपादक 'दीपावली' यांस—

**पिनाकींचें अचूक शरसंधान**

स. न.

आपल्या जानेवारीच्या अंकांतील 'पिनाकि' यांनीं दिवाळी हंगामांतील वाङ्मयीन पीकपाण्याची केलेली 'आणेवारी' फार आवडली. नियतकालिकांनूनच प्रसिद्ध होणारे जाहिरातवजा असे दिवाळी अंकावरचे अभिप्राय म्हणजे विनोदाचाच प्रकार होऊं लागल्यामुळें पिनाकींचें हें शरसंधान अचूक आणि आजकाल तरी दुर्मिळ आहे. त्यांतील आणखी एक प्रशंसनीय बाब म्हणजे त्यांच्या माऱ्यांतून दीपावली मासिक आणि तिचे संपादक हेहि सुटलेले नाहींत. 'उच्चभ्रू' साप्ताहिकांना यांत नवा आशय प्रतीत व्हावा.

वेगळें काय लिहिणें ?

आ. नम्र

**काशिनाथ घोरपडे**

गोरेगांव

**महाराष्ट्राला अभिमान वाटावा असा अंक**

स. न.

दीपावलीचा दिवाळी अंक महाराष्ट्राला अभिमान वाटावा असा 'दर्जेदार' अंक आहे हें लिहिण्यास माझीच आवश्यकता आहे असें नाहीं. परंतु कांहीं गोष्टी खटकल्या. सूचींत लिहिल्याप्रमाणें श्री. राजा बढे यांची कविता सांपडली नाहीं 'दशावतारावरील त्यांच्या खुसखुशीत श्लोकांवरच समाधान पावावें अशी अपेक्षा आहे काय ?

श्री. रणजित देसाई यांची कथा त्यांच्या नांवाला व दीपावलीच्या अभिरुचीला न शोभणारी आहे. श्री. वि. द. घाटे यांचा आत्मचरित्रांतील उतारा त्रुटित आहे. दीपावलीतील चित्रांवर पांढरा कागद असता तर बरें झालें असतें. या अंकांत एकांकिकेंची उणीव भासते.

कळावे, लो. अ. आ. नम्र

**प्र. ना. परांजपे,**

३१५ फर्ग्युसन वसतिगृह, पुणें ४

**सरस क्रिकेट विभाग**

स. न.

दीपावलीचा जानेवारीचा अंक आवडला. विशेषतः त्यांतील क्रिकेटचा विभाग अतिशय सरस वठला आहे. त्यांत भाषा आहे, विनोद आहे, इतिहास आहे, तज्ञांचा परिचय आहे—सारें कांहीं आहे. खुसखुशीतपणांत मला 'वारकरी' यांचा लेख अधिक आवडला. केशवराव भोळे यांनीं काढलेले सूर आतां काढण्याची गरज उरलेली नाहीं असें कानपूरवरून दिसतें. शैली, वर्णनांतील अचूकपणा आणि तंत्राचे ज्ञान श्री. बाळ पंडित यांच्या लेखांत दिसतें! कोलोसस्कृत इतिहासाचा आढावाहि उल्लेखनीय आहे.

आ. नम्र

**यशवंत दिवेकर**

(पत्ता दिलेला नाहीं.)

**रेडियमच्या जंगलांत**

सा. न.

नववाङ्मयाला उत्तेजन देण्याचें दीपावलीचें धोरण स्वागतार्ह. मात्र आमच्यासारख्या 'गोरगरीब' वाचकांच्या सोयीसाठीं म्हणून एखादें जातिवंत नववाङ्मय छापतांना त्याच्या खालीं स्पष्टीकरणार्थ त्याचा गद्यपद्यार्थ छापावा. असे हौशी गाईडें लिहिणारे प्राध्यापक आहेत. विशेषतः दिवाळी अंकांतील दिलीप चित्रे यांच्या 'रेडियमच्या जंगलांत' परिभ्रमण केल्यामुळें 'भोंवळ' आली. केव्हांतरी सवडीनें या कवितेचा अर्थ काय आहे याचा खुलासा कराल काय ?

आपला नम्र,

**भाल चित्रे**

अन्नपूर्णा निवास, दादर

**आदर्श मासिक**

सा. न.

इतर मासिकांची तुलना करतां दीपावली हें खरोखर संपादकांनी आदर्श म्हणून ठेवावें असें मासिक वाटतें. परिश्रम घेतले तर वाचकांच्या आवडीला योग्य तें खाद्य कसें पुरवितां येईल याचा नमूना म्हणजे दीपावली. विशेषतः महाराष्ट्र दर्शन, जुन्यातलें सोनें परमेश्वर आणि मी, रहस्यमय सत्यकथा, मूर्ति लहान कीर्ति थोर, भाषा मराठीच, भारतीय लोकनृत्यें इत्यादि आपली सदरें कुणाच्याहि अनुकरणांतून निर्माण झाली नसून स्वतंत्र आणि अभिनव अशींच आहेत. दर्जा आणि लोकप्रियता यांची योग्य ती पातळी राखण्याचें अवघड कार्य आपण केलें आहे. धन्यवाद !

आपला नम्र,

**मधुकर रामचन्द्र कर्णिक**

श्रीहरि विल्डिंग, दादर.

**एक चूक-आणि दुरुस्ती**

माझ्या 'ते धुंद क्षण' या गेल्या अंकांतील लेखांत 'प्रेमळ धैवता' ऐवजीं 'कोमल धैवत' असे शब्द चुकून पडलेले आहे. वाचकांनी कोमलच्या ऐवजी 'प्रेमळ' असें वाचावें.

आपला

**गोपाळकृष्ण भोबे**

३-१-६०

---

**हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.**